


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५१ । अंक १० । जुलै १९९८
आषाढ-श्रावण, शके १९२०
किंमत रु. १५/-
वार्षिक वर्गणी रु. १६०/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
मे.पुं. रेगे

**संपादक :**
वसंत पळशीकर

**साहाय्यक संपादक :**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन






# 'आर्य' : एतद्देशीय की परकीय?

आर्य नावाचे लोक भारत उपखंडावाहेरून प्राचीन काळी आले, त्यांच्या आक्रमणामुळे, मोहेंजदारो-हराप्पा ही नगरे ज्या समाज व संस्कृतीची मध्यवर्ती केंद्रे होती त्या सिंधू संस्कृतीचा नाश झाला ही प्राचीन भारताच्या इतिहासाविषयीची उपपत्ती अलीकडेपर्यंत सर्वमान्य होती. 'आर्य' हा एक वंश होता, या वंशाच्या लोकांचे कोठेतरी एक मूळ वसतिस्थान होते, तिथून ते युरोप, पश्चिम आशिया व भारत इकडे पसरले अशी धारणा होती. या लोकांची जी मूळ भाषा होती तिच्यामधूनच कालांतराने विभिन्न युरोपीय भाषा व संस्कृती वेगळ्या होऊन विकसित झाल्या, असे अभ्यासकांचे म्हणणे होते.

पृथ्वीवरील लोकांकडे वंशवादी दृष्टिकोनामधून पाहणे आज शिष्टमान्य नाही. 'शुद्ध आर्यवंशीयते'चा मुद्दा ज्या प्रकारे हिटलरच्या नाझी जर्मन राजवटीच्या काळात वंशश्रेष्ठत्व सांगण्यासाठी, ज्यू लोकांच्या व अन्य लोकांच्या छळ व शिरकाण यांच्या समर्थनार्थ वापरला गेला त्यामुळे वंशवादी दृष्टिकोन बदनाम होऊन गेला. भारतावाहेरचे कोणचेही लोक आज स्वतःसाठी 'आर्य' हा शब्द वापरत नाहीत. भारतात मात्र 'आर्य' ही संज्ञा वांशिक लोकसमूह या अर्थाने अजून वापरात आहे. आर्य-अनार्य असा भेद करून भारतातील लोकसमूह, भाषा, समाज व संस्कृती यांच्या विषयी बोलले व लिहिले जाते. आपण आर्यांचे वंशज आहोत याचा अभिमान बाळगणाऱ्या अनेकानेक व्यक्ती आहेत; नव्हे, समूहच्या समूह आहेत असेही म्हणता येईल. दुसरीकडे, आपण अनार्यांपैकी असून, आर्य हे आमचे मूळ शत्रू नंवर एक होत, असेही आग्रहपूर्वक मांडणाऱ्या व्यक्ती, संघटना व चळवळी आज आहेत.

स्थूलमानाने आपण असे म्हणू शकतो की, परंपरेने उच्च वर्णांमध्ये ज्यांचा समावेश होतो वा जे स्वतःला उच्चवर्णीय (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य) मानतात त्यांना आर्यत्वाचा अभिमान (व अहंकारही) असल्याचे आढळते. शूद्र व अतिशूद्र (यांच्यातच आदिवासी, भटके आदींचा समावेश) हे 'अनार्य' असा भेदभावही 'आर्य' असण्याविषयी अभिमान/अहंकार बाळगणाऱ्यांच्या ठायी प्रकट वा सुप्त स्वरूपात मनोमन आढळत आला आहे. आर्यत्वाचा अभिमान बाळगणाऱ्यांच्या ठायी संस्कृतविषयीही, ती सर्वश्रेष्ठ भाषा असल्याचा अभिमान पुष्कळदा आढळतो. वेद हेही त्यांच्या अभिमानाचा विषय असतात.

शूद्रातिशूद्रांचा ('अनार्यां'चा) पक्ष घेऊन 'आर्यां'च्या-वर्चस्वाविरुद्ध महाराष्ट्रात महात्मा फुले यांनी सरळ सरळ युद्ध पुकारले. 'आर्यां'चे समीकरण त्यांनी प्राधान्येकरून ब्राह्मणांशी घातले. त्यातही चित्पावन ब्राह्मणांशी. 'शेटजी-भटजी' हा शब्दप्रयोगही त्यांनी वापरला. शेटजींचाही समावेश मनोमन ते 'आर्य' या कोटीत करीत असावेत. स्वतःस क्षत्रिय म्हणविणाऱ्या, शूद्र बांधवांपासून स्वतःस वेगळे करणाऱ्या व श्रेष्ठत्वाचा टेंभा मिरविणाऱ्या खाशा मराठा मंडळींचा समावेश ते 'आर्यां'मध्ये करीत होते का याविषयी संदिग्धता राहते. मुद्दा असा की, भारतीय इतिहासाकडे आर्य-अनार्यांच्या संघर्षाचा – 'आर्य' जेते तर 'अनार्य' जित – परिप्रेक्ष्यामध्ये पाहण्यास व त्या भूमिकेमधून वर्तमानकालीन समाजकारण व राजकारण यांची बांधणी करण्याची सुरुवात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातच झाली.

महात्मा फुले यांनी 'आर्यभट' (ब्राह्मण) परकीय आक्रमक असल्याची भूमिका मांडल्याला शंभरपेक्षा जास्त वर्षे होऊन गेली. पण तरीही आपण असे म्हणू शकतो की, दलित-पीडितांच्या बाजूने समाजकारण-राजकारण करणाऱ्या ब्राह्मणेतर चळवळी व पक्ष, पूर्वास्पृश्यांच्या संघटना व चळवळी, तसेच डाव्या विचारांच्या समाजवादी-साम्यवादी चळवळी यांच्या क्रियाशील राजकारणात 'आर्यां'चे परकीयपण हा एक मुद्दा अलीकडेपर्यंत नव्हता. या बाबतीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर व महात्मा फुले यांच्या भूमिकांमध्येही मोठे अंतर आहे. 'आर्यां'चे मूळ वसतिस्थान, सिंधू संस्कृतीचा ऱ्हास/विनाश, त्यात 'आर्यां'ची भूमिका हे अभ्यास-संशोधनाचे, विद्वत्-चर्चेचे विषय होते. अलीकडे, भाजप व संघपरिवार यांनी हिंदुराष्ट्रवादी राजकारणाचा प्रकर्ष घडवून आणल्यानंतरच्या काळात, या राजकारणाचा प्रतिवाद करण्यासाठीचे एक बौद्धिक हत्यार म्हणून भारतातील हिंदू-उच्चवर्णीय (= 'आर्य') हे वस्तुतः परकीय आक्रमकच

अनुक्रमणिका

होत; 'अनार्य' शूद्रातिशूद्र हेच येथील मूळ लोकसमूह होत, हा मुद्दा सक्रिय राजकारणाचा मुद्दा म्हणून उपस्थित केला जात आहे.

श्रीकांत तलगेरी यांचे पुस्तक* या वर्तमान राजकीय संघर्षाच्या पार्श्वभूमीवर लिहिले गेले आहे. ही गोष्ट त्यांनी दडवून ठेवलेली नाही; उलट, डाव्या, पुरोगामी मंडळींचा कावेबाज हल्ला परतवून लावणे ही त्यांच्या लेखनामागची प्रेरणा असल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे. पहिली चाळीस पाने त्यांनी डाव्या, पुरोगामी मंडळींची कुटिल चाल स्पष्ट करण्यासाठी खर्ची घातली आहेत. सीताराम गोयल यांनी पुरस्कारादाखल जे दोन शब्द लिहिले आहेत त्यांचाही भर, वर्तमान राजकारणाच्या दृष्टीने इतिहासाचे योग्य 'वाचन' करण्याचे महत्त्व ठसविण्यावर आहे. 'प्रास्ताविका'त तलगेरी म्हणतात, "हिंदू राष्ट्रवाद म्हणजेच भारतीय राष्ट्रवाद. आर्य नावाचे कोणी लोक बाहेरून येथे आलेले असोत वा नसोत, त्याने यात काडीचाही फरक पडत नाही." (पृ. ६)

हिंदू भूमिकेमधून लिहिलेला भारताचा इतिहास हाच खरा इतिहास आहे, असे गोयल म्हणतात. 'हिंदू' म्हणत असताना, आर्य-अनार्य असा भेद ते करीत नाहीत. त्यांच्या प्रतिपादनातले तीन मुख्य घटक पुढीलप्रमाणे आहेत : ख्रिस्ताचा जन्म होण्यापूर्वीच्या काळात, काही हजार वर्षे हिंदू संस्कृती ही जगातली सर्वात श्रेष्ठ व प्रभावशाली संस्कृती होती. भारतातून ती त्या काळात सर्व जगभर पसरली. जगातल्या सर्व लोकांनी, संस्कृतींनी या हिंदू संस्कृतीकडून पुष्कळ गोष्टी घेतल्याच्या खाणाखुणा आजही मिळतात. दुसरा घटक म्हणजे, त्यांच्या मते, भारतातील मुस्लिम राजवटी या सर्व काळ परकीय राजवटीच राहिल्या आणि त्यांनी हिंदू संस्कृतीवर प्राणघातक हल्ला चढविला. ब्रिटिश (ख्रिश्चन) राजवटही, अशीच, हिंदू संस्कृतीचे खच्चीकरण करणारी होती. त्यांच्या प्रतिपादनातला तिसरा घटक हा डाव्या, पुरोगामी व सेक्युलर मंडळींवरील आरोपाच्या स्वरूपाचा आहे. या मंडळींना भारत हे राष्ट्र 'हिंदू राष्ट्र' म्हणून पुन्हा एकवार शक्तिशाली व संपन्न बनून जगात अग्रेसर ठरायला नको आहे, कारण तसे घडले तर त्यांच्या आयडियालॉजीचा त्यात पराभव आहे असे त्यांना वाटते. तलगेरी यांची भूमिका सीताराम गोयल यांच्या भूमिकेशी मिळतीजुळतीच आहे.

पण त्यांच्या पुस्तकाचा मुख्य विषय आर्य एतद्देशीय नव्हते; ते बाहेरून आले व त्यांनी येथील लोकांवर राज्य प्रस्थापित केले, या उपपत्तीचे खंडन करणे हा आहे. या उपपत्तीचे खंडन करीत असताना त्यांनी आपली राजकीय मते बाजूला ठेवून, अभ्यास-संशोधनाची रीत, शिस्त व पथ्ये सांभाळली आहेत.

'इंडो-युरोपियन भाषा' असे एक भाषा-कुल भाषाशास्त्रज्ञांना आढळून आले. संस्कृत भाषा ही प्रमुख युरोपीय भाषांची 'भगिनी' असल्याचेही आढळून आले. या कुळातील भाषा ज्या भाषेपासून उगम पावल्या अशी एक आद्य जननी भाषा – प्रोटो-इंडो-युरोपियन – व ती बोलणारा एक मूळ लोकसमूह, आणि त्या लोकसमूहाचे मूळ निवासस्थान असा विचार केला जाणे मग स्वाभाविकच म्हटले पाहिजे. 'आर्य' म्हणजे प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा बोलणारे लोक.

प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा बोलणाऱ्या लोकसमूहाचा मूळ निवास कोठे होता याबाबत एकमत नसले तरी, दक्षिण रशियाच्या भागात तो असावा यावर जास्त सहमती आढळते असे तलगेरी नमूद करतात. या प्रोटो-इंडो-युरोपियन भाषेची एक शाखा इंडो-इराणियन ही असून, संस्कृत भाषा या शाखेत समाविष्ट आहे. इंडो-इराणियन भाषा बोलणारे लोक मध्य अशियात मुळात राहत होते. त्यांची विभागणी होऊन एक विभाग इराणकडे गेला व दुसरा भारतात आला. भारतात आले ते 'आर्य' आणि त्यांची भाषा ती संस्कृत या मांडणीला विद्वानांमध्ये सार्वत्रिक मान्यता आहे, याची नोंद तलगेरी घेतात.

विसाव्या शतकात सिंधू संस्कृतीचा शोध लागल्यानंतर, भारताबाहेरून 'आर्य' लोक आले या उपपत्तीवर एक प्रकारे शिक्कामोर्तबच झाले. ऱ्हासाच्या दिशेने वाटचाल होत असलेल्या सिंधू संस्कृतीचा पुरता नाश या 'आर्य' लोकांनी केला, ते सप्तसिंधू प्रदेशात प्रथमतः स्थिरावले, तेथे त्यांनी वैदिक संस्कृती उत्कर्षास नेली व नंतर तिचा प्रसार भारतभर केला, हा वास्तव इतिहास म्हणून आज गृहीत धरला जातो. ज्या अर्थी 'आर्यां'नी सिंधू संस्कृती नष्ट केली त्या अर्थी ती 'अनार्यां'ची असली पाहिजे असा निष्कर्ष काढला गेला. सिंधू संस्कृतीची भाषा कोणत्या भाषा-कुळातली याचा नेमका उलगडा व निर्णय अद्यापि होऊ शकलेला नाही, कारण त्या भाषेची लिपी वाचली गेलेली नाही. 'आर्यां'चा ज्या लोकांशी संघर्ष झाला त्यांचा

* *आर्यन इन्व्हेजन थिअरी ॲण्ड इंडियन नॅशनॅलिझम*, श्रीकांत जी. तलगेरी, व्हॉइस ऑफ इंडिया, नवी दिल्ली, १९९३, रु. १५०/-.




ऋग्वेदात नावाने उल्लेख आहे. त्याआधारे सिंधू संस्कृती असुर, दास/दस्यु, पणि आदी लोकांची असली पाहिजे, व हे 'अनार्य' लोक होते, यांची भाषा संस्कृत वा संस्कृतोद्भव नव्हती, अशीही सर्वसाधारण मान्यता आहे.

ही उपपत्ती मुळासकट खोडून काढण्यासाठी तलगेरींनी आपला ग्रंथ सिद्ध केला आहे.

आर्य *वंशाचे* लोक असे म्हणणे चुकीचे आहे;[१] प्रोटो-प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा ज्या लोकांची भाषा होती ते लोक मुळात भारतातलेच; येथून त्यांनी स्थलांतर केले आणि टप्प्याटप्प्याने त्यांच्यातले विभिन्न गट युरोपभर, मध्य व पश्चिम आशियाभर पसरले; मूळ भाषिक समूहापैकी एक शाखा आपल्या मूळ निवासक्षेत्रातच राहिली, असे तलगेरींचे म्हणणे आहे. इंडो-युरोपियन भाषा-कुलाचे तथ्यत्व ते स्वीकारतात, पण या भाषा-कुलाचा उगम भारतातच झाला असे त्यांचे म्हणणे आहे.[२]

भारत उपखंडात द्रविड, ऑस्ट्रिक, अंदमानी, बुरुशास्की, चिनी-तिबेटी भाषा-कुलांमधील भाषा बोलणारे लोक वेगवेगळ्या भागांत प्राचीन काळापासून वस्ती करून होते. इंडो-युरोपियन भाषा-कुलातील भाषा बोलणारे लोक त्या प्राचीन काळी उत्तर भारतभर वस्ती करून होते, असे त्यांचे म्हणणे आहे.

ते जी उपपत्ती सादर करीत आहेत तिला पायाभूत आधार ते पुराणांचा देतात.[३] पुराणे प्राचीन काळीच रचली गेली, त्यांमध्ये इतिहास सांगितलेला आहे व तो मूलतः विश्वसनीय आहे असे तलगेरींचे म्हणणे आहे. पुराणांमध्ये महाभारत-युद्धापूर्वीच्या काळातल्या जवळपास शंभर पिढ्यांची राजांची वंशावळी दिलेली आढळते. ही राज्ये कोठे होती, त्यांची नावे काय होती यांचेही उल्लेख पुराणांमध्ये आढळतात. यांचा आरंभ मनु-वैवस्वतापासून होतो. प्रलयाची कथा जगभर प्राचीन साहित्यात सांगितलेली आढळते. मनु-वैवस्वताचे युग प्रलयानंतर सुरू होते. तलगेरींच्या म्हणण्याप्रमाणे ख्रिस्तपूर्व ३१०० इतका हा काळ मागे जातो. महाभारत युद्ध सुमारे ख्रिस्तपूर्व १५०० च्या आसपास झाले. मनु-वैवस्वत युगाआधीच्या काळातील राजांविषयीही पुराणे माहिती देतात.

तलगेरींच्या मते भारताच्या प्राचीन इतिहासाची निश्चिती करण्याच्या दृष्टीने दोन घटकांची निश्चिती करणे आणि त्यांच्यातील आंतरसंबंध स्पष्ट करणे याला निर्णायक महत्त्व आहे. ऋग्वेदाची रचना कधी व कोठे केली गेली? आणि, सिंधू संस्कृतीचा काळ कोणता, तिची भाषा कोणती व ते लोक कोण होते?

सिंधू संस्कृतीच्या उत्कर्ष काळी तिचे क्षेत्र विस्तीर्ण होते. तिचा ऱ्हास काळ ख्रिस्तपूर्व १५००-च्या आसपास असला तर तिचा उगमकाळ ख्रिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकात तरी नक्कीच पोचत असणार. ऋग्वेदाची रचना ख्रिस्तपूर्व १४०० च्या आसपास झाली असे अनेक पंडितांचे मानणे आहे. ऋग्वेदात उल्लेखिलेले भौगोलिक क्षेत्र आजचा पंजाब व वायव्य पाकिस्तान असे आहे, असेही विद्वानांचे म्हणणे आहे. दोन अधिक दोन बरोबर चार या न्यायाने सिंधू संस्कृतीचा ऱ्हास व नाश करणाऱ्या लोकांनीच ऋग्वेदाची रचना केली असा सहज निष्कर्ष मग हाती येतो. तलगेरी सिंधू संस्कृतीचे प्राचीनत्व मान्य करतात; ऋग्वेदाची रचना पंजाबात म्हणजे सप्तसिंधूंच्या प्रदेशात वास्तव्य करणाऱ्या लोकांनी केली ही गोष्टही मान्य करतात. पण ऋग्वेदाचा रचनाकाळ ते सुमारे हजार दीड-हजार वर्षांनी मागे नेतात; सिंधू संस्कृतीच्या उत्कर्षकाळाआधीच ऋग्वेदाची रचना झालेली होती असे त्यांचे प्रतिपादन आहे.

ऋग्वेदाची रचना करणारे तथाकथित 'आर्य' लोक सप्तसिंधूंच्या प्रदेशात कोठून व कधी आले हा प्रश्न मग निर्णायक महत्त्वाचा ठरतो. पुराणात सांगितलेल्या इतिहासाच्या आधारे, हे लोक आजच्या आग्नेय व ईशान्य उत्तर प्रदेश व पश्चिम बिहारच्या भागातून घडलेल्या स्थलांतरणाच्या ओघात सप्तसिंधूंच्या प्रदेशात पोचले असे तलगेरी म्हणतात.

प्रोटो-इंडो-युरोपियन भाषेचीही जननी म्हणायला हवी अशी एक प्रोटो-प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा बोलणारे लोक हे मूळ 'आर्य' लोक, व त्यांचे मूळ वसतिस्थान पंजाबच्या पूर्वेकडचा उत्तर भारताचा प्रदेश, ही तलगेरींची आगळीवेगळी उपपत्ती आहे. या त्यांच्या मूळ निवासस्थानांमधून या लोकांमधील काही उपसमूह हे काही कारणांनी प्राचीन काळी पंजाब-काश्मीरच्या दिशेने स्थलांतरित झाले, आणि तिथून मध्य व पश्चिम आशियात पोचले. या लोकांच्या स्थलांतरणाद्वारे प्रोटो-प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा क्रमशः जगात वेगवेगळ्या लोकांपर्यंत व प्रदेशांपर्यंत जाऊन पोचली, हा तलगेरींच्या उपपत्तीचा एक भाग आहे. या मूळ 'आर्य' लोकांपैकी काही उत्तर, मध्य व पश्चिम भारतातच राहिले, असेही त्यांचे प्रतिपादन आहे.[४]

मूळ 'आर्य' लोकांच्याच पैकी असलेल्या काही शाखांनी स्थलांतरणानंतर सिंधू संस्कृती निर्माण केली;[५] सिंधू संस्कृतीची भाषा ही इंडो-युरोपियन भाषा कुळातलीच आहे, व त्या भाषेची

अनुक्रमणिका

लिपी हीच पुढील काळातील ब्राह्मी लिपीची जननी आहे, हा तलगेरींच्या उपपत्तीचा दुसरा महत्त्वाचा भाग आहे.

ऋग्वेदामध्ये जो संघर्ष चित्रित झालेला आढळतो तो 'आर्य' व 'अनार्य' यांच्यातला संघर्ष नसून, तो 'आर्यां'मधीलच शाखोपशाखांमधील संघर्ष आहे; ती भाऊबंदकीच एकप्रकारे आहे, असे तलगेरी यांचे म्हणणे आहे.[६] ऋग्वेदाचे कर्ते – ज्यांना उद्देशून 'वैदिक आर्य' असे म्हणता येईल – ते पुरु शाखेचे लोक होते. या पुरूंचा पूर्वेतिहास ज्या पुराणांमध्ये ग्रथित आहे ती पुराणे अनु व द्रुह्यु या अन्य दोन शाखांच्या स्थलांतरणाचीही हकीकत सांगतात. ऋग्वेदात चित्रित झालेले संघर्ष हे सिंधू संस्कृतीच्या उत्कर्षापूर्वीचे आहेत. वैदिक कालोत्तर ग्रंथांत (महाभारत, बौधायन धर्मसूत्रे यांचा संदर्भ तलगेरी देतात) सिंधू संस्कृती व लोक यांचे उल्लेख येतात (ख्रिस्तपूर्व १५०० च्या आसपास) आणि हे उल्लेख समकालीन सुमेरियन दस्तऐवजांमधील उल्लेखांशी जुळतात. याच्या आधारे तलगेरी म्हणतात की, सिंधू संस्कृती ही ऋग्वेदोत्तर संस्कृती होती. अनु, पुरु, यदु अशा 'आर्य' लोकांच्या विभिन्न शाखांच्या सरमिसळीमधून आकाराला आलेल्या लोकांची ती संस्कृती होती. ही संस्कृती उत्कर्ष पावत असताना 'वैदिक आर्यां'शी (म्हणजे पुरुंशी) तिचे संघर्ष झाले. या कारणानेही असेल, पण या संस्कृतीच्या उत्कर्षकाळी 'वैदिक आर्य' पंजाबातून – सप्तसिंधूंच्या प्रदेशातून – पूर्वेकडे रेटले गेले. म्हणजे मूळ वसतिस्थानाकडे स्थलांतरण झाले. याचे पुरावे वेदोत्तर वाङ्मयात सापडतात व सर्वमान्य आहेत.

सिंधू संस्कृती ही द्राविड संस्कृती नव्हती असे म्हणताना तलगेरी पुढील युक्तिवाद करतात. प्राचीनतम द्राविड म्हणता येईल अशा तमिळ वाङ्मयात दक्षिण भारतातून उत्तरेकडे स्थलांतर केल्याच्या, त्या प्रदेशात राज्ये/वसाहती स्थापन केल्याच्या, कालांतराने तेथून परागंदा व्हावे लागल्याच्या, वा वायव्य भारत हे आपले खरे मूळ वसतिस्थान असल्याच्या स्मृती नोंदलेल्या आढळत नाहीत. जगभरचे पुराणेतिहास या प्रकारातले वाङ्मय पाहिल्यास, जर असे स्थलांतरण घडले असेल तर त्या त्या लोकांच्या मूळ वसतिस्थानाविषयी, स्थलांतरणाविषयी उल्लेख आढळतातच.

तलगेरींच्या युक्तिवादांची छाननी व त्यांची पुष्टी वा प्रतिवाद अधिकारी अभ्यासकांनी करावयास हवा. सर्वसामान्य वाचकास निवाडा करता येणे अवघड आहे. पण त्यांचे पुस्तक वाचल्यावर मनात प्रश्न उभा राहिला तो असा की, स्वतःला 'आर्य' म्हणविणारे जे कोणी लोक असतील ते मुळातले भारतातले असले वा नसले तर काय बिघडते? कारण जे लोक येथे आल्याला चार एक हजार वर्षे झाली त्या लोकांना तुम्ही परके आहात असे आज म्हणणे गैरच म्हणावयास हवे.

भारतातील आजचे उच्चवर्णीय हे प्राचीन आर्य, ही उपपत्ती टिकत नाही. क्षत्रियांमध्ये आजच्या घडीला ज्यांचा समावेश होतो ते अनेकानेक कुळांमधील व जमातींमधील आहेत ही गोष्ट सर्वमान्य आहे. तीच गोष्ट 'वैश्य' वर्णाची. प्राचीनकालीन 'विश्' म्हणजे आजचे वैश्य नव्हेत. मग उरतात ब्राह्मण. आता, ज्या सर्व कुळांचा ब्राह्मण वर्णात आज समावेश होतो त्या सर्वांचे रंग-रूप, भाषा, व्यवसाय, जीवनशैली डोळ्यासमोर आणली, त्यांच्यातील उपजाती व त्या उपजातींमधील रोटीबेटी-व्यवहारविषयक पारंपरिक प्रतिबंध ध्यानात घेतले तर, मुळात प्राचीन काळी येथे आलेल्या – म्हणजे, जरी बाहेरून समजा आले असले तरी – आर्यभाषिक लोकांमधील 'ब्राह्मण' वर्णीय कुळांमध्ये येथील अनेकानेक कुळांची 'ब्राह्मण' म्हणून नंतरच्या काळात भर घातली गेली असली पाहिजे, किंवा आजचे बहुसंख्य ब्राह्मण हे संकरज प्रजा असले पाहिजेत अशासारखा निष्कर्ष हाती येईल. महात्मा फुले यांचा खरा राग चित्पावन ब्राह्मणांवर होता, आणि त्यांच्या नजरेत बाहेरून प्राचीन काळी आलेले आर्य-भट कोण तर चित्पावन, असे होते. अन्य ब्राह्मणांबद्दल फुल्यांची धारणा वेगळी होती असे म्हणावयास त्यांच्याच एका टिपेचा आधार आहे.

विसाव्या शतकातील ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर, उच्चजातीय विरुद्ध निम्नजातीय हे भांडण भांडण्यासाठी, हे भांडण थेट चार हजार वर्षांपूर्वीपासून चालत आलेल्या महान संघर्षाचा वर्तमानकाळातला टप्पा आहे हे दाखवून देण्याचा खटाटोप कोणती मानसिकता प्रकट करतो?

तेव्हा, हा निरर्थक वाद जर आपण सोडून दिला तर आपली सर्वांचीच बुद्धी, शक्ती व वेळ यांची बचत होईल. आणि मग भारताचा प्राचीन इतिहास जाणून घेण्याचा मार्ग काही एका अर्थाने निष्कंटक होईल.

आज पाकिस्तान, बांगला देश व भारत ही तीन स्वतंत्र राष्ट्र-राज्ये आहेत. ती तशी राहावीत की त्यांचे एक महासंघराज्य







अनुक्रमणिका

बनावे, हा स्वतंत्र मुद्दा आहे. पण प्राचीन इतिहास, जडणघडण, परंपरा इत्यादी अंगांनी भारत उपखंड हे एक एकात्म क्षेत्र म्हणून विचार करायला हवा ही गोष्ट स्पष्ट आहे.

श्री. तलगेरी यांचे पुस्तक वाचत असताना मनात काही प्रश्न उपस्थित झाले. (यांचा 'आर्य' देशी की परकीय या मुद्द्याशी काही संबंध नाही.) ते असे :

(१) पाच-सहा हजार वर्षांपूर्वीचे भारतातील लोकसमूह, त्यांची लोकसंख्या व आकारमान, त्यांची जीवनशैली, त्यांचे निवासक्षेत्र, आपापसातील संबंध या बाबतीतले चित्र आपण कसे मांडू शकतो? की भारत हा उपखंड त्या काळी वव्हंशी निर्जन होता?

(२) ब्रिटिश राजवटीने प्रस्थापित केलेल्या वर्गीकरणानुसार आपण आज ज्यांची गणना अनुसूचित जमातींमध्ये करतो त्यांमध्ये काही जमाती संख्येच्या दृष्टीने बऱ्याच मोठ्या आहेत; काही मध्यम आकाराच्या, तर काही अगदी लहान आहेत. सामाजिक-सांस्कृतिक दृष्टीनेही त्या विभिन्न टप्प्यांवर/अवस्थेत आहेत. ज्या लोकसंख्येने मोठ्या व बऱ्यापैकी मोठ्या प्रदेशात आढळतात त्या कधी काळी 'आदिवासी' नव्हत्या; तर, त्या प्रतिष्ठित व 'मुख्य प्रवाहा'तील होत्या, असे असण्याची शक्यता दिसते.

तलगेरींनी पुराणांमधील ज्या मुख्य राजवंशावळींची व त्यांच्या प्रदेशांची चर्चा केली आहे त्या कुळांची 'राज्ये' व आज 'आदिवासी' म्हणून गणले जाणारे हे लोक यांचा काय संबंध होता?

(३) तलगेरींचे म्हणणे असे की, ही राज्ये ज्या लोकांची होती ते प्रोटो-प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा बोलणारे आर्य लोक होते व तेच क्रमशः फाटाफूट होत, तुकडे पडत युरेशियाभर पसरले.

त्यांची ही उपपत्ती मान्य नसलेल्यांसाठीदेखील एक प्रश्न राहतो. ही राज्ये सिंधू संस्कृतीच्या उदय-उत्कर्ष काळी अस्तित्वात होती की नाही? की, सिंधू संस्कृतीचा विनाश झाल्यानंतरच्या काळात त्यांचा उदय-उत्कर्ष झाला? जर सिंधू संस्कृती व ही राज्ये समकालीन होती असे असले तर, या दोहोंचा संबंध होता की नाही? असला तर कोणत्या प्रकारचा?

(४) आज जास्त शिष्टमान्य असलेल्या उपपत्तीनुसार इंडो-युरोपियन भाषा बोलणारे लोक पश्चिमेकडून आले, व ते सिंधू संस्कृतीच्या उत्कर्ष व ऱ्हास काळात आले. लहान लहान जथ्थ्यांच्या रूपात आले. मोठे आक्रमण करून त्यांनी सिंधू संस्कृती/समाज नष्ट केला नाही.

मग प्रश्न असा की, ही सिंधू संस्कृती ही कोण्या लोकांची निर्मिती होती? ही नागर संस्कृती होती; शेती, व्यापार, कसबी कारागिरी या बाबतीत ती प्रगत व प्रगल्भ संस्कृती होती. तिची स्वतःची लिपी होती. तिचे क्षेत्र विस्तीर्ण होते. ज्यांनी ही नेत्रदीपक संस्कृती भरभराटीला आणली ते पुष्कळ आधीपासून त्याच भागात वस्ती करून राहणारे लोक होते, हे तलगेरींचे म्हणणे योग्य दिसते. त्यांच्या मते ते इंडो-युरोपियन भाषा बोलणारे लोक होते. पण हे त्यांचे म्हणणे मान्य करायलाच हवे असे नाही.

म्हणजे मग, पश्चिमेकडून आलेले 'आर्य', सिंधू संस्कृतीचे जनक लोक व पूर्वेकडे असलेली पौराणिक राज्ये ज्यांची होती ते लोक आणि त्यांचा आंतर-संबंध यांचा विचार करावयास हवा.

(५) सिंधू संस्कृतीचा विनाश झाल्यावर, बाहेरून आलेले 'आर्य' लोक पंजाब भागात राहू लागल्यावर ऋग्वेदाची रचना झाली असे मानले तर ऋग्वेदाचा काळ इसवी पूर्व १००० च्या फार मागे नेता येत नाही.

तलगेरी ऋग्वेदाचा काळ सिंधू संस्कृतीच्याही मागे नेतात. ते म्हणतात, "चार वेद, ब्राह्मणे व आरण्यके आणि मुख्य उपनिषदे यांचा काळ सिंधू संस्कृतीच्याही आधीचा होता हे यावरून सिद्ध होते." (पृ. १७५) लोकमान्य टिळकांचे मत प्रसिद्धच आहे. त्यांच्या मते वैदिक कालखंडाची सुरुवात इसवी पूर्व ४५०० पर्यंत मागे जाते. ज्योतिर्विद्यात्मक (ॲस्ट्रॉनॉमी) उल्लेखांच्या आधारे त्यांनी त्यांची सुप्रसिद्ध उपपत्ती मांडली.

ऋग्वेदाची रचना करणारे 'आर्य' व अवेस्ता हा ज्यांचा आद्य धर्मग्रंथ आहे ते इराणच्या भूमीत स्थिर झालेले लोक हे भाऊबंदच होते असे तलगेरीही म्हणतात.

वैदिक साहित्य हे मुळात मौखिक साहित्य. दीर्घकाळपर्यंत ते मौखिकच राहिले. तर, हे अगदी शक्य आहे की, आजच्या परिचित रूपात त्यांची बांधणी होण्यापूर्वी हजार दीड हजार वर्षे आधी त्याची रचना सुरू झाली. ज्यांचे ते साहित्य होते ते लोक परिस्थितीच्या

रेट्याने स्थलांतर करीत राहिले. नव्या नव्या प्रदेशात त्यांचे वास्तव्य झाले. अन्य लोकांशी संबंध आले. जीवनाची रीत व समाजाची रचना बदलली. या सगळ्याचा समावेश – प्रक्षेपांच्या स्वरूपात वा मूळ रचनेतील फेरबदलांच्या रूपात – होत होत एक 'सुधारित' संहिता तयार होत गेली. या सुधारित संहितेचा काळ इसवी पूर्वी १४००-१००० असा असू शकतो. महाभारताच्या बाबतीतही असेच घडलेले दिसते ना.

तेव्हा, वेदसाहित्याचे अधिक प्राचीनत्व मान्य करीत असतानाच, हे लोक कोठून कोठून स्थलांतरित होत, बदलत सिंधू संस्कृतीचा नाश ओढवल्यावर सप्तसिंधूंच्या खोऱ्यात उतरले अशी कल्पना आपण करू शकतो. सुर-असुर संघर्षाच्या हकीकती पंजाबात हे लोक येऊन स्थायिक होण्याच्या आधीच्या काळातल्या असू शकतात.

(६) पुराणांमध्ये ज्या राजवंशावळी दिलेल्या आहेत त्या महाभारतपूर्व काळातल्या आहेत अशी मान्यता आहे. याचा एक अर्थ असा की, महाभारतीय युद्धाने मोठा खंड पडला. हे युद्ध या लोकांनी स्थापन केलेल्या राज्यांमधील युद्ध होते. ते सर्वसंहारक महायुद्ध होते.

महाभारत या महाकाव्याची आज उपलब्ध असलेल्या स्वरूपातली रचना ही पुष्कळ नंतरची आहे. संशोधित आवृत्ती हे 'जय' व 'भारत' यांच्या नंतरचे, तिसरे, पुष्कळ वाढवलेले असे आवर्तन आहे, ही गोष्ट परिचित आहे. मूळ युद्ध हे कोणा लोकांमध्ये झाले आणि ते कोठे व कधी झाले?

सिंधू संस्कृतीच्या उदयापूर्वीची ही घटना असेल का? हे युद्ध ज्या लोकांमध्ये झाले ते लोक आणि ऋग्वेद व अन्य वेदवाङ्मय हे मुळात ज्यांचे वाङ्मय होते ते लोक एकच होते की वेगळे?

अशी शक्यता आहे का की, ऋग्वैदिक 'आर्य' लोक हे सिंधू संस्कृतीच्या ऱ्हास काळात सप्तसिंधूंच्या खोऱ्यात स्थायिक झाले तेव्हा, महाभारत युद्धोत्तर वाताहत झालेल्या, उत्तर भारतात आधीपासून राहणाऱ्या, बऱ्यापैकी इतिहास असलेल्या प्रगत लोकांवर वर्चस्व प्रस्थापित करीत, त्यांना सामावून घेत त्यांनी अल्पावधीत परत एकदा एक प्रगल्भ समाज व संस्कृती आकारास आणली? ही वस्तुतः एक संमिश्र, व पुष्कळ पदर वा परिमाणे असलेली गुंतागुंतीची संस्कृती होती. तिची निर्मिती केवळ 'ऋग्वेद' हा ज्यांचा 'ग्रंथ' होता त्यांची नव्हती तर उभय लोकांची होती. पण तिला वैदिक असे नाव प्राप्त झाले; कारण ते लोक वरचढ होते. मध्ययुगीन मुसलमानी राजवटींच्या अमलाखाली काही एक अर्थाने अशी परिस्थिती होती. या वैदिक संस्कृतीच्या उभारणीच्या व उत्कर्षाच्या काळात, एकीकडे, वेद-वाङ्मयाची आजच्या परिचित रूपात रचना केली गेली आणि दुसरीकडे, रामायण-महाभारत या महाकाव्यांचीही. महाकाव्यांची रचना करताना गाभ्याशी असलेल्या घटना या ऋग्वैदिक 'आर्ये'तर लोकांच्या स्मृतीतल्या प्राचीन घटना होत्या. पण त्यांना काव्यात बांधले जात असताना पुष्कळ गोष्टी त्यांत अशा समाविष्ट होत गेल्या ज्या समकालीन होत्या.

आपण असे म्हणू शकतो का की, ऋग्वेदवाले लोक आणि येथील आधीचे लोक – हे दोन्ही लोकसमूह भाषिक दृष्टीने 'आर्य' असू शकतात – यांच्यातील श्रेष्ठ, प्रतिष्ठित, सत्ताधारी थरातील कुले मिळून एक एकात्म समाज घडण्याची ही एक पिढ्या दोन पिढ्या चाललेली प्रक्रिया होती. यांमधून जो वैदिक समाज व संस्कृती अस्तित्वात आली ती एक संयुक्त कृती होती. संस्कृत ही श्रेष्ठींची भाषा म्हणून या काळात जडवली-घडवली गेली असेल.

इंडो-युरोपियन भाषा कुळातले लोक बाहेरून आले नाहीत, ते इथलेच होते; किंबहुना, प्रोटो-प्रोटो-इंडो-युरोपियन भाषा ही मुळात इथल्या उत्तर भारतातल्या लोकांची भाषा होती, हे सिद्ध करण्यात तलगेरींचा हितसंबंध राजकीय स्वरूपाचा आहे. त्या खोड्यात सापडण्याचे आपणांस कारण नाही. पण, उलट टोकाला जाऊन, वैदिक संस्कृती व समाजव्यवस्था ही बाहेरून आलेल्या लोकांनी – 'आर्यां'नी – लादलेली, असाही आग्रह धरून दुसऱ्या खोड्यात अडकवून घेण्याची गरज नाही.

(७) सिंधू संस्कृतीची जवळीक अनेक अंगांनी तत्कालीन पश्चिम व मध्य आशियामधील संस्कृतींशी दिसते. एकाहून अधिक लोक या संस्कृतीच्या व समाजाच्या निर्मितीत सहभागी असण्याची शक्यता आहे. यापैकी काही कोठून कोठून स्थलांतरित होऊन सिंधूच्या खोऱ्यात व मुखाजवळील

प्रदेशात पोचले असतील तर काही मूळचे त्याच प्रदेशातील असतील. पश्चिम आशियात भरभराट पावलेल्या, मोठ्या नद्यांच्या आधारे वसलेल्या संस्कृतींच्या जातकुळीतलीच सिंधू संस्कृती ही एक संस्कृती दिसते. तिच्या उत्कर्षकाळी तिचा भारत उपखंडातला विस्तार लक्षात घेतला तर पुराणांमध्ये ज्यांचा उल्लेख येतो त्यांच्यापैकी काही कुलांचा या संस्कृतीशी संपर्क आला असणे, ते लोक या संस्कृती/समाज यांच्या प्रभुत्वाखाली आले असणे या सहज शक्य गोष्टी दिसतात.

आर्य विरुद्ध अनार्य, वैदिक विरुद्ध अवैदिक, ब्राह्मणी विरुद्ध अब्राह्मणी या आलोकात सिंधू संस्कृतीकडे पाहणे आवश्यक नाही. इंडो-युरोपियन भाषा कुलातील या अर्थाने 'आर्य' लोक सिंधू संस्कृतीच्या निर्मितीमध्ये अंशतः सहभागी असू शकतात पण तेवढ्याने ती 'आर्यां'ची निर्मिती ठरत नाही. उलटपक्षी, द्राविड लोकांची ही निर्मिती होती असेही अट्टाहासाने म्हणण्याचे कारण नाही.

तलगेरीही कबूल करतात की, ज्यांनी वैदिक संस्कृती निर्माण केली ते, स्वतःला 'आर्य' म्हणविणारे श्रेष्ठी पश्चिमेकडील लोकांना आपल्यातले, बरोबरीचे समजत नव्हते. ज्यांची भाषा (व बहुधा जीवनरीतीही) अ-संस्कृत आहे असे हे 'म्लेच्छ' लोक असा उल्लेख ते करीत असे दिसते.

प्राचीन भारताचा इतिहास सिद्ध करणे म्हणजे (जिगसॉ कोड्याचे तुकडे) कल्पनाशक्ती, विश्लेषक बुद्धी, सूक्ष्म निरीक्षणशक्ती या सगळ्यांचा उपयोग करून, एकत्र जोडून एक अर्थपूर्ण चित्र साकार करण्याचे मोठे आव्हान आहे. अमूक एकच निष्कर्ष निघेल असेच चित्र बनविण्यासाठी तुकड्यांचा वापर कसा करता येईल याबद्दल आज वेगवेगळ्या मंडळींचा आग्रह दिसतो. त्याऐवजी अनेकानेक ज्ञानशाखांच्या आधारे गोळा झालेल्या माहितीच्या तुकड्यांना निर्वैर, निर्मम व निर्मळ मनाने, तटस्थ व समत्व बुद्धीने जोडण्याचे काम करणे ही गरज आहे.

## टिपा :

१. It is, therefore, time that we got one thing very clear: there is no means, whatsoever, of postulating the exact racial type of the Original Indo-Europeans in their Original Homeland. As we will be seeing presently, the Rigveda and the Puranas provide incontrovertible evidence that the Original Homeland lay in the interior of North India; but we will still not postulate the exact nature of this Original "race".

The plain fact is that it was the language-family which spread out from the Original Homeland, and not a racial stock. The question of the Original Homeland is a linguistic one, and not a racial one. In this matter of language and race, Max Muller put the whole thing in a nutshell: "I say that even the blackest Hindus represent an earlier state of Aryan speech and thought than the fairest Scandinavians". And Max Muller certainly cannot be accused of being a Hindu chauvinist. (पृ. २५३)

२. The most logical interpretation of the evidence and the facts is that the original homeland of the Indo-European languages lay in India. It would be an exercise in sheer guesswork to try and chart out a chronological timetable of the spread of Indo-European languages from India to their later and present-day habitats, until exact datable evidence of the same is found. However, the following scenario may be postulated.

The original Indo-European language, which we will here call "proto-proto-Indo-European" to distinguish it from the hypothetical language (proto-Indo-European) reconstructed by European linguists, was spoken in interior North India; but in very ancient times it had spread out and covered a large area extending to Afghanistan, and had developed a number of dialects, which may be classified as follows:

1) *Outer Indo-European dialects*: Spoken in Afghanistan and northern Kashmir and the adjoining north Himalayan region.
2) *Central Indo-European dialects*: Spoken in what we may call the "Punjab region" and in southern Kashmir.
3) *Inner Indo-European dialects*: Spoken in the expanse of northern India from the Gangetic region to Maharashtra and from Punjab to Orissa and Bengal.

The Outer Indo-European region developed a rich concentration of dialects; and the first major migration took place with a major section of them moving out northwards and westwards towards Europe. The Outer dialects were thus the ancestral forms of the European languages. The migration of the Outer Indo-European speakers may have taken place in two waves,.....

Those (speakers of the Outer dialects) who remained behind got absorbed into the speech of the Central dialects. That some of the speakers of the Outer dialects may have retained their original speech is proved by the evidence of the Tokharian language of Chinese Turkestan (late 1st millennium AD) to the north of the Kashmir region, and perhaps by sundry other evidence (such as that of the Bangani language of the Garhwal region, .....

The proto-Indo-European language reconstructed by philologists is therefore a close approximation of the proto-Outer-Indo-European language, with the additional factors of Rigvedic and Iranian having been taken into consideration in its reconstruction. The area indicated by the paleontological study of this language is therefore the Kashmir region.

The Central Indo-European dialects, which had contacts with both the Outer and Inner dialects had developed into northern and southern groups; the northern groups were occupants of Kashmir. A body of speakers of these northern dialects (finding, as per the evidence of the Avesta, the northern winters unbearable) moved southwards into the Punjab region, and formed part of the Rigvedic culture which had developed there. Later, conflicts developed, and this section moved out westwards to Arachosia and Persia, as pointed out by Max Muller.

The Inner Indo-European dialects, meanwhile, had undergone a process of development in conjunction with the other language families of the mainland.

As the Rigvedic culture became rapidly accepted all over India a hybrid but refined language (Classical Sanskrit) was developed by the Indian grammarians, co-ordinating the Central dialect of the Rigveda with the Inner dialects spoken by the masses over the major part of North India. Gradually, by a process which is not quite clear even to linguists, the Inner dialects superseded Classical Sanskrit as a literary medium. Today, all the languages of India (with the exception of the Dardic languages, which include Kashmiri) are descendants of the Inner dialects, though highly influenced by Vedic and Classical Sanskrit. The Inner dialects have even superseded the Central dialects in the region of the Rigveda.

(पृ. १८४-१८६)

३. In any case, the cold hard fact is that the Puranas provide incontrovertible evidence that the Ultimate Indo-European Homeland lay spread out over the expanse of northern India, and that the Original Homeland of the Vedic Aryans, the Iranians, and the Western Indo-Europeans (i.e. the place where a migrant branch of the original Indo-Europeans, from the east, split into these various peoples) lay in northwestern India: in the Punjab, Kashmir and the northwest.

(पृ. ३७५)

अनुक्रमणिका






४. The history of the Indo-European family of languages may thus be summarized as follows:

In ancient, prehistoric times, the distribution of the languages in India may have been roughly the same as it is today: viz. the Dravidian languages being spoken in the south, the Austric languages in the east, the Andamanese languages in the Andaman Islands, the Burushaski language in a part of Kashmir, the Sino-Tibetan languages in the Himalayan and far eastern border areas, and the Indo-European languages certainly in more or less their present habitat in most of northern India.

Among the speakers of Indo-European languages, a great historical occurrence took place when a major part of the Indo-Europeans of south-eastern Uttar Pradesh migrated to the west and settled down in the northwestern areas — Punjab, Kashmir and the further north-west, where they differentiated into three groups: the Purus (in the Punjab, the Anus (in Kashmir) and the Druhyus (in the northwest and Afghanistan). Meanwhile, there remained various Indo-Europeans still in the interior of India: the Yadus in northern Maharashtra, Gujarat and western Madhya Pradesh; the Turvasus in the region to the east of the Yadus (not specified); groups of Sudyumnas/Ailas in central and southern Uttar Pradesh; Iksvakus in northestern Uttar Pradesh (and perhaps also in Dakshina Kosala in eastern Madhya Pradesh); and Pramsus in Bihar, to name only those of them clearly mentioned and described in the Puranas.

The Purus developed the Vedic culture of the Punjab, while the other groups of Inner Indo-Europeans (alongwith the Austric and Dravidian language speakers) developed other religious and cultural elements integral to Hinduism and Indian culture. Later, the Vedic culture of the Purus spread all over India and became the elite culture of Hinduism, while the Vedic language, and the Classical Sanskrit created from it (in combination with some Inner dialects) by the grammarians, strongly influenced all the Inner languages (Inner Indo-European, Austric and Dravidian).

Meanwhile, major sections of Anus spread out all over Western Asia and developed into the various Iranian cultures. The Druhyus spread out into Europe in two instalments: the speakers of the proto-Germanic dialect first migrated northwards and then westwards, and then later the speakers of the proto-Hellenic and proto-Italo-Celtic dialects moved into Europe by a different, more southern, route. (पृ. ४०७)

५. The Indus Valley culture was a mixed culture of Purus and Anus; the Hittites and the Tocharians were probably different mixed groups of Purus, Anus and Druhyus. The Mitanni and Kassites were certainly groups of Vedic Purus. (पृ. ४०८)

६अ Thus, it is obvious that the Arya-Dasyu conflict in the Rigveda is nothing but the Vedic-vs-Iranian conflict which took place in the Punjab region. After the bulk of the Iranians left the Punjab and migrated westwards, the terms Dasa/Dasyu ceased to be used in reference to a community, and came to be used only in the sense of "slave" and "robber" respectively. (पृ. २७८)

६ब To sum up, there is not the slightest piece of evidence that even the most ardent invasionist scholar can convincingly dig up about any conflicts between the Vedic people and "non-Aryans" of any kind. The circumstances of the Rigveda are purely Indo-European. In fact, .... while the Rigveda represents the viewpoint of only a section of the Indo-European people of the time, it records not merely the oldest Indo-Aryan, or even the oldest Indo-Iranian period known, but in fact the oldest common (or proto) Indo-European period known to us. (पृ. २९४)

अनुक्रमणिका

# धर्मनिरपेक्ष पण परंपरासापेक्ष राष्ट्रवाद*

स.ह. देशपांडे

माझ्या *सावरकर ते भाजप : हिंदुत्वविचाराचा चिकित्सक आलेख* या पुस्तकाची १९९२ ची पहिली आवृत्ती, माझ्यावर "आक्रमक जातीयवादी" हिंदुत्व पुरस्कारित केल्याच्या यशवंत सुमंत, वसंत पळशीकर व रावसाहेब कसबे यांच्या आरोपांना *नवभारत* मे-जून १९९७ च्या अंकात मी दिलेले उत्तर (पृ. ६७-६९), पुस्तकाच्या दुसऱ्या (१९९७ च्या) आवृत्तीची दीर्घ प्रस्तावना, "सर्वोच्च न्यायालय, हिंदुत्व आणि हिंदुइझम" हा माझा जुलै-ऑगस्ट १९९६ च्या *आजचा सुधारक*मधील लेख – हे सर्व वाचूनही श्री. वसंत पळशीकर यांना माझी भूमिका अस्पष्टच राहिली आहे असे वाटते व ती मी स्पष्ट करावी असे आवाहन पत्रांमधून त्यांनी मला केले आहे. शिवाय *नवभारत* जुलै-ऑगस्ट १९९७ च्या अंकात "आक्रमक, मुस्लिमविरोधी हिंदुत्ववाद आणि प्रा. स.ह. देशपांडे" असा लेख लिहून त्यांनी माझ्यावर पुन्हा टीका केली आहे.

म्हणून हा लेख लिहून मी दोन गोष्टी करणार आहे. पहिल्या भागात माझी भारताच्या राष्ट्रवादाबद्दलची भूमिका संक्षेपाने पण शक्य तितक्या स्पष्टपणे मांडणार आहे व दुसऱ्या भागात पळशीकरांच्या आक्षेपांना उत्तरे देणार आहे. तिसरा भाग समारोपाचा आहे.

तत्पूर्वी ही संधी मला दिल्याबद्दल पळशीकरांचे मनापासून आभार मानण्याची संधी मी घेतो, कारण आजकाल असे दाक्षिण्य विरळा होत चालल्याचे लक्षात येते.

## (१) माझी भूमिका

### प्रास्ताविक

माझा उद्देश भारताच्या राष्ट्रवादाची काहीएक चौकट उभी करणे हा आहे. ती सर्वस्वी नवीन आहे असे नाही; तिचे घटक वाङ्मयात विखुरलेले आहेत. त्यांना एकत्र आणून समग्र व पद्धतशीर मांडणी करावी असा माझा प्रयत्न आहे.

माझ्या पुस्तकात मी प्रस्थापित हिंदुत्वविचाराच्या परीक्षणापासून या चर्चेचा प्रारंभ केला आहे. म्हणजे असे की, या विचारधारेत कालक्रमात कोणते बदल झाले यांचा आढावा मी घेतलेला आहे व त्यातून पुढची वाटचाल कशी व्हायला हवी याचे दिग्दर्शन केले आहे.

या सर्व चर्चेत मुळात लक्षात घ्यायची ती गोष्ट अशी की माझा जोर हिंदुत्व या **संकल्पने**च्या चिकित्सेवर आहे. तशी चिकित्सा करताना काही व्यक्ती आणि संस्था यांच्या मांडण्या मला विशद कराव्या लागल्या आहेत व त्यांतल्या त्रुटी दाखवाव्या लागलेल्या आहेत. पण अशा व्यक्ती किंवा संस्था यांच्या एकूण कार्याचे मूल्यमापन किंवा त्यांच्या भूमिकांमागे असलेले वा नसलेले अंतःस्थ हेतू यांच्याशी मला कर्तव्य असलेच तर अतिशय गौणपणे आहे.

### "राष्ट्रीय" कोण?

या देशावर निष्ठा असणारे सर्व भारतीय हे "राष्ट्रीय" आहेत असा माझा मूळ विचार आहे. सर्व भारतीय याचा अर्थ कोणत्याही धर्माचे, पंथाचे, संप्रदायाचे, वंशाचे इत्यादी. म्हणजे राष्ट्रीयत्वाची ही कल्पना धर्मनिरपेक्ष आहे हे स्पष्टच आहे. असे असल्यामुळे येथली राज्यसंस्था धर्मनिरपेक्ष असणे हे आवश्यक ठरते.

### धर्मनिरपेक्ष राज्यसंस्था

धर्मनिरपेक्षतेचा माझा अर्थ असा की : (१) राज्यसंस्था तिच्या अखत्यारात येणाऱ्या भारतीय समाजाच्या समग्र प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी कोणत्याही धर्माचा आधार घेणार नाही, म्हणजेच "शब्दप्रामाण्य" मानणार नाही. ती बुद्धिप्रामाण्य मानील. (२) राज्यसंस्था धार्मिक कारणावरून नागरिकांत भेदभाव करणार नाही. (३) राज्यसंस्था कोणत्याही धर्माला उत्तेजन देणार नाही किंवा कोणत्याही धर्माला खाली दडपण्याचा प्रयत्न करणार नाही.

---

* कंसात दिलेले संदर्भ : *साभा* स.ह. देशपांडे, *सावरकर ते भाजप : हिंदुत्व-विचाराचा चिकित्सक आलेख*, राजहंस, पुणे १९९२, १९९७; *नभा*, वसंत पळशीकर, *नवभारत*, जुलै-ऑगस्ट १९९७; इतर संदर्भ पूर्ण दिले आहेत. आकडा पृष्ठाचा.

परमार्थ किंवा परमेश्वर असे काही आहे की नाही, असल्यास त्याची साधना-उपासना करावी की नाही, करायची असल्यास कोणत्या पद्धतीने करावी, त्या पद्धतीशी संलग्न असे कर्मकांड कोणते – इत्यादींबद्दलचे निर्णय व्यक्तींनी स्वतः घ्यायचे. त्यांत राज्यसंस्थेचा हस्तक्षेप असणार नाही. शिवाय या गोष्टींबद्दलच्या आपल्या मतांचे समर्थन, पुरस्कार, प्रचार, मतांतर इत्यादी करायला व्यक्तिमात्राला स्वातंत्र्य राहील. मात्र ते स्वातंत्र्य कायद्याच्या आणि सुव्यवस्थेच्या चौकटीत आविष्कृत होईल. थोडक्यात, धर्म ही व्यक्तीची खाजगी बाब राहील.

### राजकीय संस्था व धर्मनिरपेक्षता

राजकीय पक्ष किंवा संस्था शासनावर प्रभुत्व मिळवू इच्छितात म्हणून त्यांनीही धर्मनिरपेक्षता पाळणे जरूर आहे. त्याचा तपशील असा : (१) त्यांना राज्यसंस्थेच्या धर्मनिरपेक्षतेचा वर दिलेला अर्थ मान्य असला पाहिजे. (२) त्यांचे पक्ष-सदस्यत्व धर्मनिरपेक्षपणे सर्वांना खुले असले पाहिजे. (३) त्यांच्या तत्त्वप्रणालीत कोणत्याही धर्माचे प्रामाण्य मानलेले असणार नाही. (४) प्रचारसभांतून किंवा प्रचारवाङ्मयातून त्यांनी धर्मविशिष्ट आवाहने करता कामा नयेत व धार्मिक प्रतीके वापरता कामा नयेत.

आजची भारताची राज्यघटना व कायदे सर्वसाधारणपणे धर्मनिरपेक्षतेचा अवलंब करतात, पण काही महत्त्वाचे अपवाद आहेत. उदा., काश्मीरला वेगळा दर्जा आहे, तिसाव्या कलमाप्रमाणे "अल्पसंख्यां"च्या अनुदानित शिक्षणसंस्थांना धार्मिक शिक्षण देण्याची मुभा आहे, मार्गदर्शक तत्त्वांमध्ये गोहत्याबंदीचा आदेश आहे, धार्मिक अल्पसंख्य व बहुसंख्य अशी विभागणी आहे व अल्पसंख्यांच्या "संरक्षणा"साठी आयोग आहे, समान नागरी कायदा जारी नाही, अकाली दल, मुस्लिम लीग इत्यादी धर्मांचे नाव घेणारे व सदस्यत्व मर्यादित करणारे पक्ष आहेत, इत्यादी. शिवाय जी काय धर्मनिरपेक्षता राज्यघटनेत आहे तिच्या अंमलबजावणीत राजकीय पक्षांच्या सत्तालोलुपतेमुळे अनेक विकृती येतात. हे सर्व चित्र बदलले पाहिजे.

### धर्मनिरपेक्षता इष्ट एवढेच नव्हे तर अपरिहार्य

राज्यसंस्थेची धर्मनिरपेक्षता दोन कारणांसाठी हवी आहे. एक, अशी व्यवस्था हे प्रगत आणि सुसंस्कृत समाजाचे महत्त्वाचे अंग असते. बुद्धिवाद हा तिचा आधार असल्यामुळे अधिक स्वतंत्र व आत्मनिर्भर व्यक्तींचा समूह असे स्वरूप समाजाला तीमुळे प्राप्त होते.

भारताच्या संदर्भात धर्मनिरपेक्षता व्यावहारिक दृष्टीनेही गरजेची आहे. शासनाने कोणत्याही एका धर्माकडे कल दाखविला तर दुसऱ्या धर्माचे अनुयायी रुष्ट होऊन संघर्ष वळावेल. धर्मनिरपेक्षता अंतर्गत संघर्षाचे एक कारण नष्ट करते.

धर्मनिरपेक्षता **अपरिहार्य**ही आहे याचे कारण पुढीलप्रमाणे. केवळ राष्ट्रवादाच्या म्हणजे भारतीय एकात्मतेच्या दृष्टीने पाहिले तर हिंदू धर्माची देशप्रेम व सहअस्तित्व यांना कसलीही आडकाठी नाही. उलट, इस्लाम देशप्रेम त्याज्य ठरवतो आणि "जिहाद", "काफर", "तबलीग" (खऱ्या धर्माची शिकवण), वेगळा कायदा या इस्लामच्या संकल्पना सह-अस्तित्वाच्या मुळावर येतात. या कारणांमुळे मुसलमान राष्ट्रीय प्रवाहात सामील व्हायचे तर त्यांनी आपल्या धर्माच्या या प्रकारच्या आज्ञा नाकारल्या पाहिजेत. म्हणजेच समाजव्यवहारात धर्माचे प्रामाण्य नाकारले पाहिजे. या बाबतीत हिंदूंचा धर्म अडसर होत नाही म्हणून त्यांच्या धर्माला मुभा, पण मुसलमानांचा येतो म्हणून त्याचा संक्षेप अशी भूमिका हिंदूंना घेता येणार नाही (– जशी काही थोडे हिंदुत्ववादी घेताना दिसतात.). मूळ प्रश्न धर्मप्रामाण्याचा आहे. एका विशिष्ट क्षेत्रातून धर्माचे प्रामाण्य उद्ध्वस्त करायचे याचा अर्थ सर्वच धर्मांचे प्रामाण्य उद्ध्वस्त करायचे ही भूमिका अधिक तर्कशुद्ध व न्याय्य आहे.

देशप्रेम, सहअस्तित्व यांआड हिंदुधर्म येत नसला तरी त्यातल्या जातिभेद, अस्पृश्यता, स्त्रीचे स्थान इत्यादी अनेक प्रथा समाजधारणेला व राष्ट्रउभारणीला घातक आहेत. त्यांचा मुकाबला करण्यासाठीही धर्मनिरपेक्षतेचे व्यापक तत्त्व आवश्यक आहे. – अशीही धर्मनिरपेक्षतेच्या "गरजे"ची, केवळ "इष्ट"तेची नव्हे, मांडणी करता येईल.

### मात्र, संस्कृतिसापेक्ष

मात्र राष्ट्रवाद धर्मनिरपेक्ष असला तरी तो संस्कृतिसापेक्ष असला पाहिजे असे माझे मत आहे. मी जे थोडेफार वेगळे किंवा स्पष्टपणे म्हणतो आहे ते हे. त्याचा थोडक्यात खुलासा असा.

धर्मनिरपेक्षता एक चौकट देते. ती आधारभूत चौकट आहे. या चौकटीतले कायदे, धोरणे, कार्यक्रम नागरिकांत भेदभाव करीत नाहीत. पण येथे थांबता येत नाही. राष्ट्रवादाला एका प्रबळ भावनिक घटकाची आवश्यकता असते. (*साभा* ७५-७७)

अनुक्रमणिका






हा भावनिक अंश म्हणजे सर्व नागरिकांची देशावर म्हणजे देशबांधवांवर निष्ठा असली पाहिजे. त्यांचे हित हे प्रत्येकाचे महत्त्वाचे मूल्य झाले पाहिजे. पण देशावरचे प्रेम किंवा निष्ठा ही भावना आपल्या देशात आपणांला गृहीत धरून चालता येण्यासारखी नसल्यामुळे ती प्रयत्नपूर्वक निर्माण करावी लागेल. त्यासाठी इतिहास, परंपरा, संस्कृती यांकडे वळणे अवश्य आहे. (हे सर्व शब्द मी तूर्त स्थूलपणे एकाच अर्थाने वापरीत आहे.)

राष्ट्राच्या उभारणीत परंपरा परस्परसंलग्न अशी तीन कार्ये करते. एक, ती जगातल्या इतर मानव-समाजांपासूनचे आपले वेगळेपण म्हणजेच अस्मिता किंवा तदेवता (आयडेंटिटी) प्रस्थापित करते. दोन, तीमधून एकत्वाचे बंध निर्माण होतात. (समान वारसा.) तिच्या रूपात वर्तमानकालीन कर्तृत्वाला आवश्यक अशी स्फूर्तिकेंद्रे उपलब्ध होतात.

मात्र परंपरा आधुनिकतेशी जोडून घ्यावी लागते. आज उपयुक्त आणि इष्ट काय आहे याचा विचार करताना आजच्या काळातली आणि आपल्या परंपरेत बह्वंशी अनुपलब्ध असलेली स्वातंत्र्य, समता, विवेकवाद ही मूल्ये ध्यानात घ्यावी लागतात. तेव्हा परंपरेच्या ज्या घटकांकडून राष्ट्रवादाने पोषण घ्यायचे ते घटक या नव्या मूल्यांशी शक्य तितके सुसंगत असले पाहिजेत.

याचा अर्थ असा की, समग्र राष्ट्रवाद *केवळ* परंपरेच्या आधारावर मांडणे अशक्य आहे. मात्र तो परंपरेशी जोडून घ्यावा लागतो.

परंपरेचा राष्ट्रबांधणीत आणखी एक उपयोग होतो. जी आधुनिक मूल्ये स्वीकारायची ती "नवी" म्हणून स्वीकारावी लागतात. ती नवी याचाच अर्थ "अपरिचित" आणि "बाहेरून आलेली" असतात आणि या दोन्ही कारणांमुळे ती स्वीकारण्याच्या मार्गात मानसिक अडसर उद्‌भवू शकतात. अशा वेळी ती अगदीच काही नवी नव्हेत, आपणांकडेही होती, असे दाखविता आले तर नव्या मार्गावरील प्रवास सुकर ठरण्याची शक्यता असते. उदा., राजकीय लोकशाही आपणांकडेही होती हे दाखविण्याचा प्रयत्न काशीप्रसाद जयस्वाल यांनी *हिंदू पॉलिटी* या ग्रंथात केला. राष्ट्रवाद हेही एका अर्थाने नवे मूल्य आहे; पण आपणाकडेही राष्ट्रवादाला उपयुक्त असे पारंपरिक संचित आहे असे दाखविण्याचा प्रयत्न राधाकुमुद मुकर्जी यांनी *फंडामेंटल युनिटी ऑफ इंडिया* या पुस्तकात केला. प्रा. मे.पुं. रेगे यांचे *हिंदू धार्मिक परंपरा व सामाजिक परिवर्तन* हे पुस्तक याच प्रकारचे एक लक्षणीय पुस्तक आहे. अशा प्रयत्नांत कधीकधी आधुनिकतेला उपयुक्त असे सत्यही गवसते, कधी ते गवसल्याचा भास निर्माण केला जातो. यांपैकी दुसऱ्या प्रकाराने जे घडते ते "मिथक" होय. अशी मिथकेही राष्ट्रउभारणीत वापरली गेली आहेत. तेवढ्या बाबतीत राष्ट्रवाद विवेकवादाशी फटकून राहतो. मात्र राष्ट्रउभारणीच्या प्रयत्नात अ-विवेकी (इरॅशनल) घटक कमीत कमी येईल याची काळजी घेतली पाहिजे. (पाहा स.ह.दे., "परंपरा, आधुनिकता व राष्ट्रवाद", *आजचा सुधारक*, जुलै व ऑगस्ट १९९७)

### पुनरुज्जीवन नाही

आधुनिक मूल्यांच्या स्वीकाराच्या आड न येणारे परंपरेतले घटक त्यांच्या वर दिलेल्या "कार्यां"च्या दृष्टीने निवडले पाहिजेत. अशी निवड झाली म्हणजे परंपरानिष्ठ राष्ट्रवाद हा पुनरुज्जीवनवाद होणार नाही. तो परंपरेतून निवडकपणे पोषण घेईल पण तिच्या आहारी जाणार नाही, तिचे पुनरुत्थान करणार नाही.

### मिश्र परंपरा

परंपरा म्हणजे सर्व भारतीयांची परंपरा, कोणत्याही एका धार्मिक समूहाची नव्हे. या अर्थाने माझ्या मनात भारतीय परंपरेचा अर्थ मिश्र परंपरा असा आहे. गेली हजारो वर्षे निरनिराळ्या धार्मिक, भाषिक, वांशिक इत्यादी समूहांनी केलेल्या विविध प्रकारच्या योगदानांतून आपले आजचे जीवन घडलेले आहे अशी माझी धारणा आहे.

### "स्टीमरोलर" नाही

परंपरा-संबद्ध राष्ट्रवाद म्हणजे संपूर्ण सांस्कृतिक समानताही नव्हे. सर्व भारतीयांना आपल्या इतिहासाचे व परंपरेचे ज्ञान असले पाहिजे, सर्वांची काही समान अभिमानस्थाने असली पाहिजेत – म्हणजेच परंपरेचे काही घटक सर्वांना समान असले पाहिजेत. इतर घटक गट-विशिष्ट असू शकतील. हे गट भाषिक, धार्मिक, वांशिक इत्यादी असतील. म्हणजेच सांस्कृतिक वैविध्य कायम राहील. गटांच्या संस्कृतींचे आविष्कार कायदा, सुव्यवस्था आणि अखिल भारतीय निष्ठा इत्यादींशी अर्थातच सुसंगत असतील. तेव्हा सांस्कृतिक राष्ट्रवाद म्हणजे सर्वांवर एकाच संस्कृतीचा रूळ फिरवणे नव्हे.

अनुक्रमणिका

**जीवनावर हिंदुत्वाचा प्रभाव**

मात्र ही जी मिश्र परंपरा आहे तिच्यातला बराचसा भाग जिला हिंदू असे आज म्हटले जाते त्या परंपरेचा असणे अपरिहार्य आहे. याची कारणे दोन. एक, तो वारसा फार जुना आणि आपल्या इतिहासाच्या फार मोठ्या काळावर पसरलेला आहे. दोन, या देशात हिंदूंची बहुसंख्या आहे. ज्या वेळी सर्व समाजाचे ऐकात्म्य घडून येईल त्या वेळी हिंदू, मुसलमान ही अभिधाने लुप्त होतील आणि सर्वांची एक विशाल अशी "भारतीय" परंपरा साकार होईल.

**संक्रमण-काळ, हिंदू जीवनपद्धतीचा प्रभाव**

समाजाच्या आजच्या भेगाळलेल्या स्थितीमधून एकात्मतेकडे प्रवास करताना जो संक्रमणाचा काळ असेल त्यात आणखी काही गोष्टी अपरिहार्य ठरणार आहेत.

कितीही सक्त धर्मनिरपेक्षतेचा आग्रह धरला तरी केवळ हिंदुसमाज हा बहुसंख्य असल्याकारणाने भारतीय जीवनाच्या एकूण वळणावर हिंदू जीवनपद्धतीचा असर राहणार हे उघड आहे. (इतिहासातही तो तसा झालेला आहे.) हे वास्तव धार्मिक अल्पसंख्यांनी स्वीकारले पाहिजे आणि त्याच्याशी जुळवून घेतले पाहिजे. कोणत्याही देशातल्या अल्पसंख्यांना असे करावेच लागते.

ही "हिंदु-वर्चस्वा"साठी चेतावणी नाही; प्राप्त परिस्थितीत काय स्वाभाविक आहे याचे दिग्दर्शन मी करीत आहे.

**संक्रमणकाळ; धर्मविशिष्ट संघटन**

या व्यवस्थेत कोणत्याही धार्मिक समाजाने आपापले संघटन करायला प्रत्यवाय दिसत नाही. या संघटनांचा उद्देश राजकीय नसेल तर सामाजिक सुधारणावादी आणि सांस्कृतिक असेल. प्रत्येक धार्मिक समाजाचे अंतर्गत प्रश्न वेगळे असल्यामुळे अशा गट-विशिष्ट सामाजिक चळवळींची आवश्यकता नाकारता येणार नाही.

संक्रमणकाळात हिंदुसंघटनेला काय महत्त्व असेल याचा विशेष विचार आवश्यक आहे. सर्वच धार्मिक समूहांना वर सांगितल्याप्रमाणे सामाजिक-सांस्कृतिक उद्दिष्टांसाठी संघटित होण्याची मुभा असेल तर हिंदू समाजालाही ती अर्थातच राहील. मात्र हिंदू समाजाला त्याची विशेष आवश्यकता राहील. याचे कारण इतर समाजांच्या मानाने हिंदू समाजात फुटकळपणा आणि तदुत्पन्न दुबळेपणा अधिक आहे आणि त्यामुळे हिंदुसमाजावर आक्रमणे होत आलेली आहेत. पण एक संघटित, अंतर्गत दृष्ट्या समतेवर आधारलेला, समर्थ समाज म्हणून त्या समाजाची प्रतिमा उभी राहिली तर आक्रमणांना पायबंद बसेल.

**थोडी रूपरेखा**

परंपरानिष्ठ राष्ट्रवादाचा वरचा आशय लक्षात घेऊन भारतीय संदर्भात त्याची रूपरेखा पुढीलप्रमाणे दिग्दर्शित करता येईल.

पुनरुज्जीवन टाळून आधुनिकतेशी जुळणाऱ्या परंपरेच्या घटकांत थोर व्यक्तींची परंपरा हा मला सर्वात महत्त्वाचा घटक वाटतो. (*साभा* २०७-२१३) या व्यक्ती आपल्या विविध क्षेत्रांतील कर्तृत्वामुळे थोर झालेल्या असतात. या व्यक्तींचे आपण "वारस" आहोत ही जाणीव स्फूर्तिप्रद होते, ऐक्याला दृढता देते आणि व्यक्तिपरंपरा देशविशिष्ट असल्यामुळे अस्मिताही प्रस्थापित करते. राष्ट्रवाद म्हणजे एका अर्थाने पूर्वज-पूजा असते असे म्हटले गेले आहे ते खरेच आहे. राष्ट्रीय भावनेचा हा अर्कच होय असे म्हणायलाही हरकत नाही. म्हणून थोर व्यक्तींची एक सर्वसंग्राहक यादी करावी असे नंतरच्या एका टिपणात मी सुचविले होते. थोर पूर्वजांच्या गौरवात व स्मरणात हे अभिप्रेत आहे की तो गौरव त्यांच्या कर्तृत्वामागील मनःशक्तींचा असेल. उदाहरणार्थ, आदि-शंकराचार्यांची प्रज्ञा महत्त्वाची; त्यांचा मायावाद ज्याला स्वीकारायचा त्याने स्वीकारावा, शासन त्याचा उपदेश करणार नाही. (*साभा* २०७)

याशिवाय समाजाची सरमिसळ झाली पाहिजे म्हणून सर्वसमावेशक उत्सव-समारंभांची योजना करावी असे सुचविले आहे. (*साभा* २१३-२१५)

भाषा, वाङ्मय, ललित कलांचा वारसा हे संस्कृतीचे मुख्यतः धर्मविरहित आविष्कार होत. त्यांचा परिचय होणे, जपणूक होणे या गोष्टी घडल्या पाहिजेत. (*साभा* २१५-२१६)

हे आविष्कार प्रामुख्याने धर्मरहित असले तरी धर्माच्या अनुषंगाने व धर्माचा परिवेष घेऊन आलेले असणे शक्य असते. पण आज त्यांच्याकडे ऐहिक दृष्टीने पाहता येते. उदा., वेदवाङ्मय धार्मिक आहे. पण विद्यार्थ्यांना त्याचा परिचय आर्ष संस्कृत, त्याचे व्याकरण, छन्दःशास्त्र, भाषाशास्त्र, इतिहास (त्यात धर्माचाही इतिहास असू शकेल), मानवशास्त्र, समाजशास्त्र इत्यादी अंगांनी करून देता येतो.

ही केवळ रूपरेखा झाली. तीत तपशील खूपच भरावा





लागेल. यावर चर्चा व्हावी. "रूपरेखा मान्य असणाऱ्या विविध धर्मांच्या विचारवंतांनी एकत्र येऊन तपशिलाची चर्चा करावी. तो पक्का झाल्यावर परस्पर समजुतीचा एक मसुदा तयार करावा, त्याला विस्तृत प्रसिद्धी द्यावी व चर्चा घडवून आणाव्या. अशा रीतीने लोकमत बदलण्याचा एक व्यावहारिक कार्यक्रम हातात घेणे शक्य आहे." (अप्रकाशित टिपण)

### या भूमिकेचे वेगळेपण

ही माझी राष्ट्रवादविषयक भूमिका. रूढ हिंदी राष्ट्रवाद आणि रूढ हिंदुराष्ट्रवाद यांपासून ती वेगळी कशी याचा निर्देश या ठिकाणी युक्त होईल.

हिंदी राष्ट्रवाद सर्व भारतीयांना राष्ट्रीय समजतो. मीही तसेच करतो. फरक असा की, हिंदी राष्ट्रवाद बळकटपणे येथल्या परंपरेशी बांधलेला नाही. परंपरेला आणि जी मुख्यतः "हिंदू" परंपरा असणार आहे तिला त्या विचारात मध्यवर्ती स्थान नाही. हिंदी राष्ट्रवादात परंपरेचा आशय ओतला की माझा विचार सिद्ध होतो.

तो आशय नसेल तर "काही भौगोलिक सरहद्दींच्या आत असलेले सर्व लोक राष्ट्रीय" अशी "प्रादेशिक राष्ट्रवादा"ची (टेरिटोरियल नॅशनॅलिझमची) अवस्था त्याला प्राप्त होते.

हिंदुराष्ट्रवादाच्या दोन शाखा. पहिली सावरकरांची.* सावरकर हिंदू हा "राष्ट्रीय समाज" समजतात आणि तो "पुण्यभूमी" या निकषावर. यात भारतात जन्म पावलेल्या धर्मांखेरीज इतर धर्मांचे लोक राष्ट्रीयत्वाच्या परिसरातून कायमचे हद्दपार होतात. हे मला मान्य नाही. माझा राष्ट्रवाद समावेशक म्हणजे सर्व भारतीयांना कवेत घेणारा आहे. तो "इंटेग्रेशनिस्ट" आहे; सावरकरांचा तसा नाही.

मात्र सावरकरांनी कल्पिलेले हिंदुराष्ट्र प्रायः धर्मनिरपेक्ष आणि लोकशाही स्वरूपाचे आहे. येथे माझा विचार सावरकरांशी जवळीक साधतो.

सावरकरांचा राष्ट्रवाद संस्कृतिनिष्ठ आहे ही आणखी एक जवळीक आहे. संस्कृतीतला ऐहिक अंश ते कटाक्षाने निवडतात हीही एक जवळीक आहे. शिवाय सामाजिक समतेचा सावरकरांचा आग्रह मला जवळचा आहे. मात्र सावरकर जेव्हा संस्कृतीविषयी बोलतात तेव्हा ते हिंदूंच्या संस्कृतीविषयी बोलतात; "मिश्र" संस्कृती त्यांच्या मनात आहे असे दिसत नाही. येथे माझी सावरकरांपासून वेगळीक आहे.

संघाने "हिंदू"ची (कागदपत्री तरी) व्यापक म्हणजे "भारतीय" अशी व्याख्या करून बीजरूपाने धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचा उच्चार केला आहे. मात्र "भारतीय राष्ट्रवाद" असे नामाभिधान त्याला न देता त्याला "हिंदुराष्ट्रवाद" असे म्हणावे हा त्याचा आग्रह आहे. माझाही तोच आग्रह माझ्या *सावरकर ते भा.ज.प.*... या पुस्तकात प्रकट झाला होता. (*साभा* २१७-२०) पण अधिक विचार करता "भारतीय" या नावाला पसंती द्यावी असे मला आता वाटते. पण नाव अलाहिदा; समावेशक राष्ट्रवाद ही संघाशी माझी एक जवळीक आहे.

दुसरी जवळीक हा राष्ट्रवाद परंपरेशी नाते असलेला हवा या तत्त्वाबद्दल आहे.

संघाच्या विचारधारेपासून मी तीन बाबतींत दूर आहे. एक, प्रत्यक्ष वर्तनात आणि कधीकधी विचारांतही संघपरिवार "हिंदू"ची संकुचित (सावरकरीय किंवा त्याहूनही संकुचित टिळकीय) व्याख्या मानतो. दोन, संस्कृतीचा ऐहिक भाग तो साक्षेपाने निवडून काढीत नाही. याचा अर्थ तो उपासनात्मक आणि कर्मकांडात्मक हिंदुधर्म सर्वांवर लादू पाहतो असे नाही; मात्र "सनातन धर्म" किंवा "हिंदू मूल्ये" यांना प्रतिष्ठा देऊ पाहतो. हे एक प्रकारचे शब्दप्रामाण्यच आहे आणि या अर्थाने संघाच्या विचारात "संस्कृतीमागून धर्म डोकावतो" असे मी म्हटलेले आहे. (*साभा* प्रास्ताविक, पाच) तीन, संघविचारात सामाजिक समतेवर निःसंदिग्धपणे जोर दिला जात नाही.

श कु द (अ.भि. शहा, नरहर कुरुंदकर, हमीद दलवाई) यांची एकूण भूमिका व माझी भूमिका यांमधले अंतरही स्पष्ट करणे जरूर आहे. त्यांचा आधुनिकतेचा, इहवादाचा आग्रह मला मान्य आहे. किंबहुना माझ्या दृष्टीने धर्मनिरपेक्षता आणि इतर आधुनिक मूल्ये ही येथल्या राष्ट्रवादाची पायाभूत मूल्ये आहेत. मात्र श कु द येथेच थांबतात. उदा. समान नागरी कायदा एकदा झाला की हिंदू, मुस्लिम ऐक्याचा बराच प्रश्न सुटला असे त्यांना वाटते की काय अशी कधीकधी शंका येते. शिवाय मुसलमान आधुनिक म्हणजे पुरोगामी झाले म्हणजे राष्ट्रवादीही होतील ही तर्कपरंपराही मला संशयास्पद वाटते. राष्ट्र उभे राहण्याला काही भावनिक बंध लागतात. हे बंध

* येथे सावरकरांच्या नावाशी जो राष्ट्रवाद रूढीने जोडला जातो त्याच्या अनुरोधाने लिहीत आहे. तोच सावरकरांचा राष्ट्रवाद काय याची चर्चा पुढे येणार आहे.

परंपरेतून मिळतात आणि ते प्रयत्नपूर्वक जोपासावे लागतात. म्हणून राष्ट्रवादी विचारात या विषयांची चर्चा करावी लागते. पण हे तिन्ही विचारवंत गंभीरपणे राष्ट्रवादाच्या स्वरूपाची चर्चा करीत नाहीत.

हिंदी राष्ट्रवादाच्या रूढ विचारप्रणालीशी श कु द-विचाराची तुलना करता माझ्या असे ध्यानात येते की, त्यांनी हिंदी (प्रादेशिक) राष्ट्रवादच मांडला; मात्र मुस्लिम प्रश्नाचे विश्लेषण करून (शहांच्या शब्दात) गांधींचा "राम-रहीम" मार्ग हे त्यावर उत्तर कसे नाही हे सांगितले व करडी धर्मनिरपेक्षता व इतर आधुनिक मूल्ये यांचा हिंदी राष्ट्रवादाच्या आशयात समावेश केला. ही एक राष्ट्रवादी विचारात त्यांनी (विशेषतः शहांनी) घातलेली भर समजावयास हवी. पण माझ्या दृष्टीने जो पुढचा प्रवास व्हायला हवा होता तो त्यांनी केला नाही. तो म्हणजे राष्ट्रीय भावबंधनाचा शोध.

खरे म्हणजे वर वर्णिलेली माझी भूमिका माझ्या पुस्तकात व मागे निर्दिष्ट केलेल्या लेखनात वरीचशी स्पष्ट झाली आहे हे मी त्यात दिलेल्या संदर्भांवरून लक्षात येईल. फक्त माझ्या या लेखापूर्वीच्या लेखनात संक्रमणकाळाचा विचार नाही. त्याची भर मी या पहिल्या भागात घातली आहे. एकात्म समाज ही माझी आदर्श भारतीय समाजाची कल्पना आहे. मात्र ते आजचे वास्तव नाही. आजच्या त्रासदायक वास्तवातून आदर्शाकडे जाताना एक "अल्पकालीन" (शॉर्ट टर्म) विचार करावा लागतो. मात्र अल्पकालीन धोरणे दीर्घकालीन धोरणांशी संवादी असावी अशी काळजी घ्यावी लागते. संक्रमण काळाबद्दल मला तूर्त काय वाटते ते मी सांगितले आहे. ते विवाद्य असणे शक्य आहे. त्यावर अधिक चर्चा व्हावी असे मला वाटते.

आता मी पळशीकरांच्या आक्षेपांकडे वळतो. वर अत्यंत संक्षेपाने दिलेल्या माझ्या भूमिकेवर या चर्चेतून अधिक प्रकाश पडेल आणि अजूनही अस्पष्ट राहिलेल्या जागा असतील तर त्या स्पष्ट होतील अशी आशा आहे.

## (२) पळशीकरांचे आक्षेप

पळशीकरांना माझी मांडणी आक्रमक व मुस्लिमविरोधी वाटते. माझे पुस्तक "काही काळाने परत एकदा वाचल्यावर पहिल्या वाचनाने वनलेले मत चुकीचे होते असे वाटले नाही;" असे ते म्हणतात (*नभा* ६७). एवढेच नव्हे तर हिंदुत्ववादात मी सुचविलेल्या "सुधारणां"मध्ये "या जातकुळीच्या हिंदुत्ववादातला मुस्लिमविरोध व आक्रमकता कमी न होता तो काही अंगांनी परिष्कृत होईल व अधिक बलिष्ट व प्रभावी ठरेल असे आश्वासन आहे;" (*नभा* ६७) असे त्यांचे म्हणणे आहे. तेव्हा त्यांचे नेमके आक्षेप कोणते आहेत ते पाहू.

(अ) माझ्या पुस्तकाची "रचना" मी अशी केली आहे की, जीमधून माझा आक्रमक हिंदुत्ववाद प्रतीत होतो असे पळशीकरांना वाटते. "रचना" म्हणताना त्यांच्या मनात नेमके काय आहे हे मला नीटसे कळले नाही. एक अर्थ असा दिसतो की, मी माझ्या पुस्तकाचा प्रारंभ डॉ. आंबेडकर, अ.भि. शहा, नरहर कुरुंदकर व हमीद दलवाई यांच्या मुस्लिम प्रश्नाच्या विवेचनापासून केला आहे. या लेखकांना "हा प्रश्न कसा दिसत होता हे सांगण्यापासून सुरुवात करण्यामागे एक योजना आहे" (*नभा* ६०) असे पळशीकरांनी म्हटले आहे. म्हणजे माझ्या मनात काही "दुष्ट" योजना आहे असा यात ध्वनी आहे. ती कोणती हे स्पष्ट नाही.

अर्थात मी या लेखकांचे आधार काही योजनेने घेतले होते यात शंकाच नाही. पण ती कसलीही अश्लाघ्य योजना नव्हती. हिंदुत्ववाद्यांनी किंवा हिंदुत्ववादी, संघवाले असा छाप वसलेल्यांनी मुस्लिम प्रश्नाबद्दल काही लिहिले तर त्याकडे दुर्लक्ष करण्यात येते, अशा लिखाणात केवळ त्यांचे पूर्वग्रह प्रतिबिंबित झालेले असतात असे समजले जाते, असा माझा व अनेकांचा अनुभव आहे. म्हणून "मुस्लिमविरोधी पूर्वग्रहांपासून अलिप्त" अशा विद्वानांचा संदर्भ मी घेतला व तसे जाहीरही केले. यात माझे काय चुकले हे माझ्या अजूनही ध्यानात येत नाही. असे करण्यात वाचकांची काही फसवणूक झाली काय? उलट, या लेखकांच्या म्हणण्याचा "विपर्यास" मी केलेला नाही, असे पळशीकर स्वतःच सांगतात. (*नभा* ६३)

शिवाय माझ्या पुस्तकाच्या निमित्ताने या सर्व लेखकांची मुस्लिम प्रश्नाविषयीची मते वाचकांसमोर आली हेही मला महत्त्वाचे वाटते. आंबेडकरांचे आजचे अनुयायी आणि त्यांचे समर्थक विचारवंत यांनी आंबेडकरांच्या कार्याची ही बाजू – म्हणजे मुस्लिम प्रश्नांचे विश्लेषण आणि त्यांची एका काळची हिंदुसंघटनाबद्दलची आस्था – कधी उजेडात आणल्याचे दिसले नव्हते. ती माझ्या लिखाणामुळे आली हे एकूण चांगलेच झाले नाही का?

अनुक्रमणिका

श कु द यांचे विश्लेपणही वाचकांसमोर या निमित्ताने आले हीही एक चांगली गोष्ट झाली. मुस्लिम प्रश्नाकडे उघड्या डोळ्यांनी वघणारे सगळेच "जातीयवादी" नसतात हे वाचकांच्या मनावर ठसले असेल तर तेही चांगलेच नाही का? शिवाय समाजवादी किंवा समाजवादाच्या जवळ असलेल्या या मंडळींच्या विश्लेपणाचा इतर समाजवाद्यांवर फारसा परिणाम झालेला नाही, ते या प्रश्नाकडे डोळेझाकच करीत राहिलेले आहेत हेही वाचकांच्या मनावर ठसले असण्याचा संभव आहे आणि तसे झाले असेल तर तेही चांगलेच आहे.

एकूण ही जी मी पद्धत स्वीकारली ती फार उपयुक्त आहे असे मला वाटते.

आणखी एक मुद्दा. आंवेडकर व श कु द यांचे आधार मी घेतलेले असले तरी मुस्लिम प्रश्नावद्दल माझ्या पुस्तकात माझे म्हणून काही विवेचन आहेच. सवंध दुसरे प्रकरण मी केलेल्या विवेचनाचेच आहे. यात मी मुस्लिम कालिक-सृष्टीतील मुस्लिम मनाचे दर्शन, मुस्लिम प्रश्नाचा आंतरराष्ट्रीय संदर्भ, मुस्लिम लोकसंख्येचा प्रश्न आणि अलीकडच्या ठळक घटना या चार भागांत माझे विचार मांडले आहेत. तेव्हा 'रचने'च्या वावतीत मी केवळ इतरांचे आधार घेतो असा आक्षेप असेल तर त्यात अर्थ नाही.

(आ) पण "रचने"च्या वावतीत पळशीकरांचा आणखी एक मुद्दा असा दिसतो की, पुस्तकाचा फार मोठा भाग – २३५ पृष्ठांपैकी ९३ पृष्ठे – मुस्लिम प्रश्नाला वाहिला आहे (*नभा*. ६१) आणि त्यामुळे तो मुस्लिमविरोधी आहे असे सिद्ध होते. "ग्रंथाची पहिली ९३ पाने मुस्लिम प्रश्नाच्या मांडणीत खर्च करून मग हिंदुत्ववादाच्या सावरकरांच्या विचाराकडे स.ह. वळतात याचा अर्थच असा नाही का की वस्तुतः मुस्लिमविरोधीच हिंदुत्ववादाची मांडणी तेही करीत आहेत?" असे ते विचारतात (पृ. ६१).

असे जर तर्कशास्त्र पळशीकरांच्या मनात असेल तर ते अजव आहे. एखाद्या पुस्तकात एखाद्या विषयाला प्रमाणावाहेर जागा मिळाली असे एखाद्या वाचकाला वाटले तर त्याने पुस्तकाचा "तोल विघडला" असे फार तर म्हणावे. अशी (सौंदर्यशास्त्रीय) टिप्पणीही लेखकाला उपयुक्त ठरेल यात शंका नाही. पण मुस्लिम प्रश्न या विषयाचा विस्तार वाढल्यामुळे ते विवेचन मुस्लिमविरोधी कसे होते हे माझ्या ध्यानात येत नाही. मला तर वाटते की मी आणखी बरेच काही लिहायला हवे होते. उदाहरणार्थ, आपल्या देशात चालू असलेल्या मुस्लिम-तुष्टीकरणाचा इतिहास संक्षेपाने तरी मी द्यायला हवा होता. असे मी केले असते तर मुस्लिमप्रश्नविषयक विवेचनाला एक सामग्र्य आणि तोल प्राप्त झाला असता. असो.

(इ) श कु द यांची मांडणीच मुळात आक्रमक आहे आणि ती मी मान्यतेने उद्धृत करीत आहे असा आणखी एक आक्षेप पळशीकर घेतात. "रूढार्थाने हिंदुत्ववादी नसतानाही शहा-कुरुंदकर-दलवाई यांच्या भूमिकेत वा मांडणीत अनेक जागी आक्रमक स्वरूपाचा मुस्लिमविरोध आढळतो ही गोष्ट खरीच आहे", असे ते म्हणतात. (*नभा*. ६२)

श कु द यांच्या येथे प्रस्तुत असलेल्या मांडणीचा सारांश असा की, मुसलमान मुजोर आहेत, उलट हिंदू भ्याड आणि दुवळे आहेत. कुरुंदकर तर म्हणतात की, मुसलमानांनी इतरांचा मुसलमान नसण्याचा हक्क मान्य केला नाही तर "मुसलमानांचा मुसलमान असण्याचा हक्क नाकारला जाणे एवढा एकच पर्याय शिल्लक राहतो." कुरुंदकरांच्या या विधानाला मी स्वतःच "आक्रमक" म्हटले आहे, हेही पळशीकर अगत्याने दाखवून देतात.

कुरुंदकरांचे हे वाक्य आणि त्यावरील माझी टीप तूर्त वाजूस ठेवू. इतर उताऱ्यांवावत श कु द सत्यस्थितीचे चित्रण करीत आहेत असे माझे मत आहे. मुसलमानांची "मुजोरी" हा त्यांच्या स्वभावातला एक घटक आहे असे माझेही मत आहे. (मुस्लिम नियतकालिकांतील जे उतारे मी दिले आहेत ते या मुजोरीची साक्ष पटविणारे आहेत.) म्हणून हे उतारे पळशीकर म्हणतात तसे मी "मान्यतेने" उद्धृत केले आहेत.

या आक्षेपाला उत्तर एवढेच की, सत्यस्थितीचे वर्णन म्हणजे "आक्रमकता" नव्हे. हे वर्णन चुकीचे किंवा अतिरंजित असेल तर ते आक्रमणाच्या हेतूने केले आहे असे म्हणता येईल. तसे पळशीकर करीत नाहीत आणि तरीही त्याच्यावर आक्रमकता लादतात.

(ई) हिंदुसंघटनाचे आवाहन करणे म्हणजे आक्रमकता, असा पळशीकरांचा यापुढचा आक्षेप आहे.

एखाद्या समाजाला आपणांवर आक्रमण होते, कारण आपण असंघटित आहोत, असे वाटत असेल तर त्याला संघटित

होण्याचा हक्क आहे. संघटनाचे स्वरूप काय यावर ते आक्रमक असेल की नाही हे अवलंबून राहील. दुसरे असे की, शक्ती संघटित झाली की, तिचा वापर करावा लागतोच असे नाही. शक्तीचे नुसते अस्तित्व प्रतिबंधक (Deterrent) होऊ शकते.

दलितांवर "दलित" म्हणून अत्याचार होत असतील तर त्यांनी त्या कारणासाठी दलित म्हणून संघटित होणे आपण वैध समजतो. तसेच हे नाही का?

शिवाय दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत "संघटन" व "हिंदुसंघटन" या शब्दांमागच्या माझ्या विवक्षा मी स्पष्ट केल्या आहेत. त्यांचा सारांश असा की, (१) "हिंदू" शब्द मी धर्मनिरपेक्ष "भारतीय" या अर्थाने पुस्तकात वापरलेला आहे. मुसलमानांचे उदाहरण घेऊ. राष्ट्रवादी या अर्थाने काही मुसलमान या हिंदुसंघटनात सामील झालेले असतील तर काही मुसलमान बाहेर राहतील. म्हणजे हिंदू धर्मीय व इतर अशी ही विभागणी असणार नाही. म्हणजेच हे हिंदुसंघटन जातीय किंवा मुसलमान म्हणून मुसलमानांचा विरोध करणारे असणार नाही. (२) हिंदू शब्दाचाच पुनर्विचार करावा आणि "भारतीय" या शब्दाला पसंती द्यावी असे नवे पाऊल मी उचलले आहे. ते का हेही सांगितले आहे. त्यामुळे हिंदुसंघटन या ऐवजी "राष्ट्रवादी भारतीयांचे संघटन" असे म्हणावे लागेल. (३) "संघटन" शब्दाला लोक दचकतात. "संघटन म्हटल्याबरोबर शिस्तबद्ध व कदाचित शस्त्रसज्ज युवकांची सैन्ये संचलन करीत असल्याची चित्रे डोळ्यांसमोर तरळू लागतात. तसे होण्याचे कारण नाही. संघटन म्हणजे एखाद्या विशिष्ट ध्येयासाठी लोकमताचे संघटन (मोबिलायझेशन). त्याचे मार्ग सनदशीर व लोकशाहीशी सुसंगत असू शकतात. मला जे संघटन अभिप्रेत आहे ते या प्रकारचे" (दुसरी आवृत्ती प्रस्तावना, सहा व एकूणच पाच ते दहा). तेव्हा याही आक्षेपात तथ्य नाही.

(उ) पळशीकरांची खरी ठसठस वेगळीच आहे. ती त्यांच्या एका वाक्यात प्रकट झाली आहे. माझ्या पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी मुस्लिम प्रश्नाच्या तोपावेतोच्या विवेचनाचा मी सारांश दिला आहे आणि पळशीकरांनीही आपल्या लेखात संक्षेप करून पण यथायोग्यपणे तो उद्‌धृत केला आहे. त्याचा निर्देश करून ते विचारतात, "त्यांनी (स.हं.नी) दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी जो सारांश सादर केला आहे तो कोणत्या मानसाला, भूमिकेला समर्थन पुरवतो? मुसलमान जर धर्म, संस्कृती इत्यादींमुळे मुळातच असे असतील तर तर्कसंगत भूमिका 'आक्रमक' हिंदुत्ववाद हीच अंगीकारायला हवी हाच संदेश 'हिंदुसंघटन' या स.हं.नी दिलेल्या उत्तरामधून सामान्य वाचकापर्यंत पोचत नाही का?" (*नभा.* ६४)

मुस्लिम वर्तन आणि त्याची मुळे यांवद्दल मी जे लिहिले आहे ती माझ्या मते सत्यस्थिती आहे. ती भयकारक आहे हे खरेच आहे पण म्हणून तीवर पांघरूण घालावे अशा मताचा मी नाही. माझ्या या वर्णनाचा समाचार घ्यायचा तर तो तथ्यांच्या (Facts) आधारावर घेतला पाहिजे. उदाहरणार्थ, इस्लामच्या धर्मग्रंथांतील आदेशांचा माझ्या लेखनात आलेला उल्लेख चुकीच्या अर्थाने आलेला आहे किंवा मी निर्दिष्ट केलेल्या आदेशांच्या उलट अर्थाची विधानेही पुरेशा प्रमाणात उपलब्ध आहेत असे पळशीकरांनी दाखवायला हवे होते. तसे काही त्यांनी केलेले नाही; किंबहुना त्यांच्या सबंध लेखात या विषयाला स्पर्शही नाही.

खरे म्हणजे आक्रमकत्वाची टीका अगोदरच अपेक्षित करून मी पुढीलप्रमाणे लिहिले होते : "मुसलमानांच्या प्रवृत्ती व वर्तन यांवाबत मी फार कडक भूमिका घेतली आहे असे कोणास वाटेल आणि म्हणून मला ते 'आक्रमक' म्हणत असतील अशी शक्यता आहे. त्यावाबत माझे म्हणणे असे. या पुस्तकात मी केलेले मुस्लिम प्रश्नाचे विश्लेषण सामान्यपणे मुसलमानांना प्रतिकूल आहे यात शंका नाही. मात्र ज्यांच्या लेखनाच्या आधारे हे विश्लेषण करण्यात आले आहे ते लेखक – उदा. डॉ. आंबेडकर, प्रा. शहा, प्रा. कुरुंदकर, श्री. हमीद दलवाई – मुस्लिमद्वेष्टे नव्हते हे वाचकांनी समजावून घेतले पाहिजे. मीही मुस्लिमद्वेष्टा नाही, म्हणजेच मुसलमानांचे धर्मांतर, निर्वासन किंवा निर्मूलन करावे या मताचा नाही. मुसलमान समाजाला राष्ट्रीय प्रवाहात सामील करून घेतले पाहिजे असे माझे मत आहे. माझ्या राष्ट्रवादी विचारांची चौकटही धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाची आहे. मात्र असे असले तरी मुस्लिम प्रश्न मुद्दाम सौम्य करून मांडावा, त्याला मोहक मुलामा द्यावा असे मला वाटत नाही. या देशात अनेक विचारवंत असे आहेत की, ज्यांना माझ्याप्रमाणेच या प्रश्नाची सोडवणूक व्हावी असे वाटते, मात्र असे करताना मुसलमान दुखावणार नाहीत याची अतिरिक्त काळजी घेताना ते दिसतात. हा प्रकार योग्य नाही. कोणत्याही प्रश्नावर परिणामकारक उत्तर शोधून काढायचे असेल तर त्याचे स्वरूप नीटपणे लक्षात घेतले पाहिजे व

मांडले पाहिजे. वाचकाची फसवणूक होईल अशा शैलीत लिहिता कामा नये. माझे मत असे आहे की, मुस्लिम प्रश्न मुळात उग्र स्वरूपाचा आहे एवढेच नव्हे तर त्याची उग्रता दिवसेंदिवस वाढत आहे. मला जे सत्य वाटते ते सांगण्याचा माझा प्रामाणिक प्रयत्न आहे. त्यावर पांघरूण न घालता विवेचन केले तरच या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मिळेल असा माझा विश्वास आहे. मुस्लिम वाचकांनीही ही माझी भूमिका लक्षात घ्यावी व मी केलेले विवेचन द्वेषमूलक आहे असे समजू नये." (*साभा*, प्रस्ता. सात)

एकाच तथ्यावरून किंवा तथ्यांच्या संचावरून काढलेले वेगवेगळ्या व्यक्तींचे धोरणात्मक निर्णय वेगळे असू शकतात. त्यामुळे निखळ तथ्य मांडणारा माणूस अमुक एका धोरणाला पाठिंबा देतो किंवा त्या तथ्यामधूनच धोरणाची विशिष्ट दिशा सूचित होते असे म्हणता येणार नाही. त्या त्या व्यक्तींची धोरणे काय किंवा त्या कोणत्या उपाययोजना सुचवतात हे स्वतंत्रपणे तपासले पाहिजे. माझी धोरणविषयक भूमिका काय आहे याचा पुरावा पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत, विशेष स्पष्टीकरणासहित दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत, पळशीकरांना मी उपलब्ध करून दिलेल्या माझ्या आणखी एका लेखात आणि *नवभारत*च्या मे-जून १९९७ मधील लेखात मी दिलेला आहे. पुन्हा एकदा सारांश द्यायचा तर मुस्लिम प्रश्न भयावह असला तरी मुसलमानांना भारतीय समाजात एकात्म करून घेतले पाहिजे असे माझे मत आहे.

मात्र सत्यस्थितीचे चित्रण म्हणजेच आक्रमकत्वाला आवाहन असे पळशीकर म्हणणार असतील तर मी हजार स्पष्टीकरणे देऊनही उपयोग होणार नाही.

आणि "हिंदू"ऐवजी "भारतीय" शब्दाची माझी पसंती आणि "संघटन"चे मी केलेले स्पष्टीकरण हे सर्व वाचून "हिंदुसंघटन" हा शब्द पळशीकर पुन्हा का वापरीत आहेत?

"मुळातच" मुसलमान असे आहेत, म्हणजे ते कधीच बदलणार नाहीत आणि म्हणून अर्थातच त्यांना चोपून काढणे हा एकच त्यावर उपाय आहे, अशी माझी मांडणी नाही. मुळात मुसलमान इतर चारचौघांसारखेच आहेत. फक्त त्यांचा धर्म वा त्या धर्माचा त्यांच्यापर्यंत पोचणारा अंश आणि अर्थ येथल्या अनर्थाला कारणीभूत झाला आहे असे माझे मत आहे. भारतीय मुसलमानांची मनोरचना त्यांच्या धर्माबरोबरच त्यांचे धर्मगुरू व राजकीय पुढारी यांनीही घडवली आहे. खैर, मी या विषयाचा परामर्श घेतला नाही. नाही तर "रचना" आणखी बेतोल झाल्यामुळे पळशीकरांना ती अधिक आक्रमक वाटली असती. पण हाही विषय मी चर्चेत घ्यायला हवा होता. येथे माझे मत थोडक्यात सांगितले आहे. मुसलमानांनी त्यांच्या धर्माच्या व धर्मगुरूंच्या पकडीतून सुटणे अवश्य आहे असे माझे मत आहे.

पृ. २२४ ते २२७ (*साभा*) असा जवळजवळ तीन पृष्ठे मजकूर मुसलमानांना राष्ट्रीय प्रवाहात कसे आणावे याबद्दल मी लिहिला आहे आणि या विविधांगी प्रबोधनाच्या दिशा सुचविल्या आहेत. या दिशांमधली ७ वी व शेवटची दिशा "मुसलमान पुढारी हे खरे धर्मश्रद्ध नसून अनुयायांच्या धार्मिकतेचा फायदा लुबाडणारे स्वार्थसाधू आहेत हे त्यांच्या (मुसलमानांच्या) लक्षात आणून देणे" ही आहे. मुसलमानांच्या दारिद्र्य, बेकारी इत्यादी आर्थिक प्रश्नांची दखल घेण्याबद्दलही सुचवले आहे. मुसलमानांचा स्वभाव अपरिवर्तनीय आहे अशी माझी समजूत असती तर मी असे केले नसते.

आता कुरुंदकरांचे वाक्य आणि त्यावरील माझे भाष्य. ही भाषा कुणा आक्रमक हिंदुत्ववाद्याची नसून कुरुंदकरांची आहे असे सांगण्यात माझा हेतू "कुरुंदकरदेखील रागावू शकतात," हे सुचवण्याचा आहे. त्याला माझ्या "आक्रमकत्वा"चा पुरावा म्हणून हजर करण्यात पळशीकर अतिरेक करीत आहेत.

(ऊ) हिंदुत्ववादात काही "सुधारणा" मी सुचवल्या आहेत त्यांमुळे त्याची आक्रमकता कमी न होता वाढेल अशी पळशीकरांची भीती आहे.

मी ज्या सुधारणा सुचविल्या आहेत त्यांची पार्श्वभूमी स्पष्ट केली पाहिजे. सावरकरांची "हिंदू"ची व्याख्या संकुचित होती पण ती कार्यवाही-क्षम (ऑपरेशनली यूसफुल) होती. म्हणजे राष्ट्रीय कोण व न-राष्ट्रीय कोण हे ओळखून काढण्याची सोय तिच्यात होती. उदाहरणार्थ, लष्करात न-राष्ट्रीयांना प्रवेश द्यायचा नाही असा नियम केला तर भारतोद्भव नसलेल्या धर्मांच्या अनुयायांना प्रवेश बंद अशी कार्यवाही करणे सोपे होते. ही व्याख्या मी त्याज्य ठरवली आणि संघाची "हिंदू"ची उदार व्याख्या स्वीकारली. ही व्याख्या सांगते की, "देशावर प्रेम असलेला" किंवा "देशाच्या संस्कृतीचा-परंपरेचा मान राखणारा" प्रत्येक भारतीय तो हिंदू. पण या व्याख्येत मला एक धोका दिसतो तो असा की, या नव्या अर्थाने कोण हिंदू

अनुक्रमणिका

आणि कोण अहिंदू हे व्यवहारात ठरवता येणार नाही, ती "ऑपरेशनल" नाही. देशावर प्रेम असण्याची किंवा संस्कृतीचा मान राखण्याची क्रिया मानसिक असते आणि तिचे प्रतिबिंब नियतपणे दृश्य व्यवहारात पडते असे नाही. अशा स्थितीत राष्ट्रीय कोण आणि न-राष्ट्रीय कोण हे ठरविता येत नाही. ज्या राज्याला शासन चालवायचे आहे त्याच्या दृष्टीने ही फार गैरसोयीची गोष्ट आहे.

म्हणून नवी व्याख्या कायम ठेवूनही तिच्यामधून निर्माण होणारा धोका टाळण्यासाठी काय करावे याचा मी विचार केला. सावरकरांच्या व्याख्येला सोडचिठ्ठी दिल्यावर हा विचार धर्मनिरपेक्ष दृष्टिकोणातून करणे अर्थातच अवश्य होते.

म्हणून मी सूचना अशी केली की, एक प्रतिज्ञापत्रक तयार करावे, उदा., "माझी सर्वोच्च निष्ठा ह्या भारतभूमीवर राहील. त्या निष्ठेपुढे माझा धर्म, माझा संप्रदाय, प्रदेश, भाषा, गाव इत्यादींवरच्या निष्ठा गौण राहतील.... ह्या अर्थाने मी स्वतःला "हिंदू" म्हणवून घेण्यात धन्यता मानतो."... इत्यादी. (*साभा* २२२, २२७-२८) या प्रतिज्ञापत्रकावर सही न करणाराला मतदान-पत्रिका मिळू नये असे मी सुचवले. असे केल्याने न-राष्ट्रीय जे कोणी हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादी असतील ते लोकशाही राज्यकारभारात भाग घेऊ शकणार नाहीत.

अशीच विनंती मी संघाला केली आहे. संघात नव्या अर्थाने हिंदू म्हणून "ट्रोजन हॉर्सेस" (हिंदुत्वाचा बुरखा घेतलेले जातीयवादी) शिरतील हा धोका नाहीसा व्हावा म्हणून संघाने आपल्या प्रतिज्ञेतील हिंदू "धर्म" - विषयक परिभाषा तर टाळावीच पण देशप्रेमाची हमी म्हणून वरच्यासारखीच प्रतिज्ञा प्रवेशाच्या वेळीच अनिवार्य करावी. असे मी सुचविले आहे.

या सगळ्यातला "आक्रमकपणा" लपून राहत नाही असे पळशीकर म्हणतात. (*नभा* ६८)

यात माझ्या मते आक्रमकपणा कसलाही नाही. देशाचा कारभार निर्धोकपणे चालायला हवा की नाही? कारण न-राष्ट्रीय किंवा अ-राष्ट्रीय शक्ती या देशात भरपूर आहेत, हे सत्य मी विसरू शकत नाही – माझ्या सर्व राष्ट्रवादविषयक विवेचनात हे गृहीतकृत्य आहे हे मी उघडपणे सांगत आलो आहे. हे गृहीतकृत्य चुकीचे असेल तर तसे दाखवावे. पण ते गृहीत मान्य असेल तर मी म्हणतो तशा प्रकारच्या तरतुदीला पर्याय नसेल.

हाही पर्याय पुरेसा परिणामकारक नसेल ही शक्यता अर्थात आहेच. पळशीकरांनाही तसे वाटतेच (*नभा* ६८). मलाही तसे वाटते आणि अधिक परिणामकारक उपाययोजना कुठली याचा मी विचार करीत आहे. उदा., नागरिकत्वाच्या कायद्यात काही तरतूद करता येईल का?

आणखी एक गोष्ट. मी दुसऱ्या आवृत्तीला लिहिलेली प्रस्तावना पळशीकर पुनःपुन्हा दुर्लक्षित करीत आहेत. तेथे हिंदूऐवजी "भारतीय" शब्दाला मी पसंती दाखवली आहे. त्यामुळे वरील प्रतिज्ञापत्रकात "हिंदू"ऐवजी "भारतीय" शब्द घातला पाहिजे हे ओघानेच आले. या प्रतिज्ञापत्रकावर सही करणारा तो 'भारतीय' अशी जर भारतातल्या एकूण रहिवाश्यांची विभागणी केली तर त्यात "आक्रमकता" राहते की देशाच्या सुरक्षिततेच्या आणि स्वास्थ्याच्या दृष्टीने एक सोय उपलब्ध होते याचा पळशीकरांनी विचार करावा.

तेव्हा "हिंदू राज्या"ला पळशीकरांनी आता तरी भिण्याची गरज नाही. राज्य "देशप्रेमी भारतीयां"चे असेल. "देशप्रेमी" या शब्दाला "हिंदू" या शब्दाऐवजी वापरता येईल का या संदर्भात पळशीकर करू पाहत असलेली चेष्टा (*नभा* ६८) कुचकामी आहे. संज्ञांचे मी स्पष्ट केलेले आशय लक्षात न घेता केवळ त्यांचा अक्षरशः अर्थ घेतल्यामुळे पळशीकरांचे विवेचन फारच खालच्या पातळीवर घसरले आहे असे मला वाटते.

### कुणीच आक्रमक नाही काय?

"आक्रमक, मुस्लिमविरोधी हिंदुत्ववाद कोणीच सांगितला नाही, तसे आचरण कोणाचे झालेले नाही असे स.हं.चे मत आहे काय?" असे विचारून पळशीकर म्हणतात की, जे कोणी असे असतील त्यांच्या हिंदुत्ववादाचे विश्लेषण मी करायला हवे होते. (*नभा* ६३).

आक्रमक हिंदुत्ववाद कुणीच सांगितला नसेल असे छातीवर हात ठेवून मी म्हणू शकणार नाही. पण प्रत्येक विचारसरणीचे अधिकृत किंवा सर्वमान्य समजले गेलेले प्रवक्ते असतात आणि त्यांची वक्तव्ये प्रमाण धरून चालणे ही चर्चेची रास्त पद्धत आहे असे मी धरून चालतो. नथूराम गोडसे किंवा कर्तारसिंग थत्ते हे हिंदुत्वविचाराचे मान्य प्रवक्ते मी समजत नाही. जबाबदार प्रवक्ते मी सावरकर, हेडगेवार, गोळवलकर, ठेंगडी, दीनदयाळ, अडवानी, वाजपेयी हे समजतो. सावरकरांची भाषा त्यांच्या वृद्धापकाळातल्या अखेरच्या पुस्तकात अंगावर शहारे येतील इतकी आक्रमक आहे आणि तिच्या पुसटत्या

अनुक्रमणिका

उल्लेखापलीकडे माझ्या पुस्तकात काही आले नाही हे मी मान्य करतो. पण सावरकरांचे हिंदुराष्ट्राचे कल्पनाचित्र अल्पसंख्यांबाबत भेदभाव करणारे नाही. (याबद्दलचे आणखी विवेचन पुढे येणार आहे.) इतरांच्या विधानांत मला आक्रमकपणा अजून आढळलेला नाही. (गुरुजींचे १९३९ सालचे *वुई* हे पुस्तक आज आधाराला घेता कामा नये, असे माझे मत आहे. त्यांची मते पुढच्या काळात बदललेली स्पष्ट दिसतात.)

"जे" कुणी आक्रमक असतील त्यांची नावे पळशीकरांनी दिली असती तर बरे झाले असते. अजूनही द्यावीत. म्हणजे मी त्यांचे वाङ्मय अभ्यासीन. यात पळशीकरांची एक अडचण असेल हे मी समजू शकतो. ती अशी की, प्रकाशित वाङ्मयात आक्रमकत्वाचे प्रतिबिंब पडलेले त्यांना दिसणार नाही. म्हणूनच बहुधा त्यांना नावे देता येत नाहीत. हीच तर मेख आहे. टोकावरच्या आणि आततायी भूमिका मांडणारी मंडळी प्रत्येक विचारसरणीच्या परिघावर असतात. त्यांची एक "फोकलोअर" असते, ती विषारी असते आणि तिची उघड वाच्यता होत नाही. अशा मंडळींना काबूत ठेवणे हे जबाबदार नेत्यांचे एक निरंतरचे काम होऊन बसते. हिंदुत्ववादी परिसरात अशी मंडळी नव्हती किंवा आताही नसतील असे माझे म्हणणे नाही. प्रश्न असा की, तो त्या त्या विचारसरणीचा मुख्य प्रवाह समजायचा का? की "मार्क्सिझम" आणि "व्हल्गर मार्क्सिझम" यांत जसा फरक केला जातो किंवा "आय ॲम नॉट ए मार्क्सिस्ट" असे मार्क्सला म्हणावे लागले तशी स्थिती असते की नाही? काँग्रेसच्या विचारसरणीचे खरे प्रवक्ते कोण? गांधी-नेहरू की स.का. पाटील?

संघ सोडल्यापासून गेली ५१ वर्षे संघाचा किंवा कुठल्याही हिंदुत्ववादी संस्थेचा मी सदस्य नाही. त्यामुळे आजकाल जी काय फोकलोअर असेल तिच्याशी माझा परिचय नाही. मात्र ऐतिहासिक कारणांमुळे संघामध्ये आज असलेले व नसलेले माझे परिचित आणि मित्र आहेत त्यांच्याशी माझी कधीकधी बोलणी होतात. शिवाय एक सामाजिक हालचालींचा अभ्यासक म्हणून संघाची वाटचाल मी दुरून का होईना पाहत आलो आहे. त्यावरून मला असे वाटते की, संघातले वातावरण जातीयवादी, मुस्लिमविरोधी आणि आक्रमक नाही. उलट पुरावा हातात आला तर मी माझे मत बदलीन. पळशीकरांकडे आहे असे दिसते. तो त्यांनी मला दाखवावा. (कानात सांगितला तरी चालेल.)

**सावरकरांची "वकिली"**

सावरकर व संघ यांची मी "वकिली" करतो असे पळशीकर म्हणतात. एवढेच नव्हे तर तशी वकिली करण्यासाठीच मी पुस्तक लिहिले आहे असा आरोप करतात (*नभा* ६७). या आरोपाला उत्तर दिले पाहिजे. प्रथम सावरकर घेऊ.

सावरकरांच्या वाङ्मयाचा अभ्यास केल्यावर इतर अनेक सावरकर-अभ्यासकांपेक्षा माझे निष्कर्ष निराळे निघाले आहेत. मुख्य निष्कर्ष असा की, त्यांचा हिंदुराष्ट्रवाद कडवा नाही. "..... सावरकरांचे कल्पित हिंदुराष्ट्र आणि हिंदी राष्ट्रवाद्यांनी प्रारंभी कल्पिलेले विशुद्ध हिंदी राष्ट्र ह्यांमध्ये मूलतः फरक नाही. फरक फक्त दोनच आहेत. एक, हिंदुराष्ट्र धर्मनिरपेक्ष व लोकसत्ताक असले तरी हिंदू संस्कृतीची छाप त्यावर राहणार आहे; दोन, एका विशिष्ट सेवेत (संरक्षण), एका विशिष्ट जमातीला (मुसलमान), एका विशिष्ट विभागापुरता (उत्तर सीमा) प्रवेश मिळणार नाही. (दुसरा फरकही व्यावहारिक अर्थाने महत्त्वाचा नाही. सावरकर जे उघडपणे सांगत ते प्रत्यक्षात आजचे शासन करीतच असते.)" (*साभा* १२८) – असे मी लिहिले होते, त्यांना हिंदी राष्ट्रवाद हवा होता आणि त्याच्या पोटात हिंदुसंघटन हवे होते. मात्र हिंदुसंघटन बलवान करण्यासाठी, "त्याला एक विजिगीषु मानसिक उभारी देण्यासाठी" त्यांनी हिंदुराष्ट्राचा उच्चार चालू ठेवला असावा असा माझा तर्क आहे. पुढे मी असेही म्हटले आहे की, "सावरकरांच्या हिंदुराष्ट्रवादावरील हे भाष्य त्यांच्या जनमानसात रूढ असलेल्या प्रतिमेशी विसंगत म्हणून विवाद्य ठरेल अशी शक्यता आहे."

हे प्रकरण मी जबाबदारीने व माझ्या मते पुरेसा अभ्यास करून लिहिले आहे. यामुळे खळबळ उडायची तर खरे म्हणजे सावरकरवादी वर्तुळात. असा श्रोतृसमाज असलेल्या सभेत या विषयावर मी दोनदा व्याख्यानेही दिली. पण अशी काही खळबळ झाल्याचे माझ्या नजरेस आले नाही. निदान जाहीर रीतीने तरी नाही. इंदोरहून प्रकाशित होणाऱ्या *हिंदु अस्मिता* या पाक्षिकात विरोधी मजकूर लिहून आला पण मी दिलेला पुरावा खोडून टाकण्याचा प्रयत्न त्यात नव्हता.

सावरकर रूढार्थाने हिंदी राष्ट्रवादी होते असे निश्चयाने म्हणता आले नाही तरी त्यांची भूमिका संभ्रमात टाकणारी एवढे तरी कमीत कमी म्हणता येईल. तसेही मी कित्येक वेळा म्हणालो आहे.

पुरावे देण्यासाठी एक संपूर्ण प्रकरण (१५-१६ पृष्ठे) मी लिहिले आहे.

माझा निष्कर्ष मलाच धक्का देणारा होता हेही या ठिकाणी नोंदले पाहिजे. धक्का दोन कारणांसाठी. एक, सावरकरांची जी वैचारिक प्रतिमा तपशिलात जाण्यापूर्वी दृढपणे माझ्या मनात होती ती ढासळू लागली. दोन, सावरकरांचे सर्वच विचार सुसंगत व तर्ककर्कश नाहीत हे मला उमगू लागले.

आता पळशीकरांचे म्हणणे पाहू. माझ्या विवेचनाच्या आधारेच सावरकरांचा राष्ट्रवाद मुसलमानांना वगळणारा म्हणजेच तो जातीयवादी (द्विराष्ट्रवादी) आणि आक्रमक होता हे त्यांनी दाखविले आहे. पण हे सर्व संदर्भ प्रकरण ४ ("सावरकरांचा हिंदुराष्ट्रवाद : भाग पहिला") या प्रकरणाला आहेत. या प्रकरणाच्या अखेरीस मी म्हटले आहे : "सावरकरांच्या 'हिंदू' च्या व्याख्येच्या आधारे त्यांच्या राष्ट्रवादाचे विवेचन आपण ह्या प्रकरणात केले. पण व्याख्येपलीकडे जाऊन सावरकरांचे नेमके मनोगत काय हे पाहू जाता मनात अनेक शंका निर्माण होतात. त्यांची चर्चा पुढच्या प्रकरणात करू." (*साभा* ११२) मग पुढच्या ५व्या प्रकरणात ("सावरकरांचा हिंदुराष्ट्रवाद : भाग दुसरा") पहिल्याच परिच्छेदात म्हटले, "सावरकरांच्या मताप्रमाणे भारतातले मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, यहुदी हे हजारो वर्षे येथे राहत असूनही, भारत ही त्यांची 'पितृभू' असूनही, राष्ट्रीयत्वाच्या कक्षेबाहेर राहतात असे आपण मागच्या प्रकरणात पाहिले. ते सर्व विवेचन आपण सावरकरांच्या हिंदुत्वाच्या छंदोबद्ध व्याख्येच्या व तिच्याशी सुसंगत अशा इतर विधानांच्या आधारे केले. पण त्यावरून सावरकरांच्या राष्ट्रवादाचे स्वरूप पूर्णपणे लक्षात येत नाही. सावरकरांची अल्पसंख्याकांविषयीची मते, 'पुण्यभू'बद्दल वेगवेगळ्या संदर्भात त्यांनी केलेले विवेचन, हिंदुराष्ट्राचे त्यांनी काढलेले कल्पनाचित्र आणि व्यापक 'भारतीय' राष्ट्रवादाबद्दल केलेली जरा वेगळ्या प्रकारची विधाने – हे सर्व पाहता एक वेगळे चित्र मनात उमटू लागते." (*साभा* ११३) आणि मग मी १५-१६ पाने पुरावा हजर करतो.

याला "आटापिटा" असे नाव पळशीकरांनी दिले आहे. त्यांची मर्जी! मात्र हा पुरावा खोडून काढण्याचे परिश्रम त्यांनी केलेले नाहीत.

कडवा म्हणावा असा हिंदुराष्ट्रवाद सावरकरांनी सांगितला यात शंकाच नाही. पण या भूमिकेला छेद देणारा खूप पुरावा सावरकरांमध्येच मिळतो आणि त्याचे काय करायचे हा अभ्यासकापुढे प्रश्न असायला हवा. हा पुरावा दुर्लक्षित करणे हा सावरकरांच्या भूमिकेवर अन्याय झाला असता हे शहा वगैरेंवर अन्याय झाला म्हणून तक्रार करणाऱ्या पळशीकरांनी ध्यानात घ्यायला हवे.

सावरकर आक्रमक हिंदुत्ववाद सांगत होते हा सरळ तर्कसंगत निष्कर्ष काढण्याची "बला" टळावी म्हणून मी ५ वे प्रकरण लिहिले आहे असे पळशीकर म्हणतात (*नभा* ६५) ते खरे नाही. सावरकरांवरील पहिले प्रकरण लिहिताना मी त्यांना हिंदुराष्ट्रवादी ठरवले आणि मग त्यांना उजळा देण्यासाठी पुढच्या प्रकरणात त्यांना व्यापक राष्ट्रवादाच्या जवळ आणून ठेवले अशी गोष्ट वस्तुतः घडलेली नाही. सावरकरांवरील पहिल्या (४ थ्या) प्रकरणाच्या प्रारंभीच्या विभागाच्या शेवटी मी म्हटले होते, "सावरकर 'हिंदुराष्ट्राचे उद्गाते' होत.... हे त्यांचे वैचारिक क्षेत्रातले महत्त्वाचे योगदान समजले जाते. लोकमानसात त्यांचे चित्र 'हिंदुराष्ट्रवादी' किंवा 'हिंदुराष्ट्रवादाचे उद्गाते' असे आहे; 'हिंदुसंघटनवादी' असे नाही. पण ते खरे हिंदुसंघटनवादीच की काय ह्याचा आपल्या मनाशी निर्णय करावा लागेल... ह्या (चवथ्या) प्रकरणात 'पुण्यभू'वर आधारित केलेल्या 'हिंदू'च्या व्याख्येच्या अनुरोधाने चर्चा करू. पुढच्या (पाचव्या) प्रकरणात त्या व्याख्येपलीकडे जाऊन काय दिसते हे पाहण्याचा प्रयत्न करू." (*साभा* ९५) हिंदी राष्ट्रवादाच्या जवळ येणारे सावरकर हा 'आफ्टरथॉट' नाही.

सावरकरांवरील माझ्या दुसऱ्या प्रकरणाचे दोनच संदर्भ पळशीकरांनी दिले आहेत, त्यांचा विचार करू. "भारत हा हिंदूंसाठी राखून ठेवलेला, हिंदूंचा देश असला पाहिजे," हे सावरकरांचे विधान मी पुस्तकात उद्धृत केले आहे. (*साभा*. १२५) ते पळशीकर त्यांच्या 'आक्रमक' या आरोपाच्या संदर्भात पुन्हा उद्धृत करतात. (*नभा* ६६) पण सावरकरांच्या या वाक्यानंतर ती पुढे लगेच लिहिले आहे की, यात जो या देशाचे हिंदू "स्वामी" किंवा "मालक" असल्याचा सूर आहे त्याचे प्रतिबिंब सावरकरांच्या हिंदुराष्ट्राच्या कल्पनाचित्रात पडलेले नाही. म्हणजे विरोधी पुराव्याचा मी लगेच निर्देश केला आहे. त्याच्याकडे पळशीकरांचे लक्ष नाही. दुसरा संदर्भ असा : मी लिहिले होते, "...सावरकरांचा राष्ट्रवाद 'हिंदुराष्ट्रवाद' नसून 'मुस्लिमेतर-हिंदी राष्ट्रवाद' आहे असे म्हणणे प्राप्त आहे." (*साभा* १२७) हेही माझे विधान पळशीकरांनी उद्धृत केले

आहे. (*नभा* ६६) मला हे विधान "करावे लागते" याचा अर्थ सावरकरांची भूमिका व्यापक राष्ट्रवादाची आहे हे सिद्ध करण्याचा माझा "आटापिटा" यशस्वी होत नाही असे पळशीकरांचे म्हणणे आहे.

याबद्दल दोन गोष्टी. एक, माझी ही सावरकरांच्या राष्ट्रवादाची मांडणी बरोबर असेल तर एक गोष्ट तरी स्पष्ट होते – मुसलमान सोडून सर्व अल्पसंख्य "राष्ट्रीयत्वा"त समाविष्ट होतात. म्हणजे "पूण्यभू"वर आधारित व्याख्या मागे पडते आणि व्याख्येतले "हिंदुत्व" उरत नाही. ही व्याख्या "भारतीय"शी समांतर होत नाही पण सावरकरांच्या हिंदुत्वाहून व्यापक होते. सावरकरांच्या हिंदुत्वाचा धर्माशी असलेला संबंध आणखी तुटतो.

दुसरी गोष्ट. मुसलमानांमधल्या बोहरा, खोजा वगैरे (शिया) मुस्लिमांविषयी सावरकरांना फारसा दुजाभाव नाही हे मी दाखविले आहे. (*साभा* ११४-११५) म्हणून सावरकरांचा मुस्लिम विरोध "सुन्नी – मुस्लिम – विरोध" ठरतो. म्हणजे राष्ट्रीयची कल्पना अधिक व्यापक होऊन "भारतीय"च्या आणखी जवळ येते.

तिसरी गोष्ट याहून महत्त्वाची आहे. हे जे सर्व "न-राष्ट्रीय" लोक आहेत त्यांना सावरकरांनी कल्पिलेल्या राज्यसंस्थेत इतरांबरोबर समान हक्क आहेत. किंबहुना सावरकर हिंदुराष्ट्राच्या राज्यसंस्थेचे जे चित्र काढतात ते पाहिले म्हणजे त्यांनी हिंदुराष्ट्राचा घोष कशासाठी चालू ठेवला होता असा प्रश्न पडतो. हे जे चित्र आहे ते धर्मनिरपेक्ष लोकशाही राज्यसंस्थेचे आहे, वर सांगितल्याप्रमाणे वंशी "विशुद्ध" हिंदी राष्ट्रवादाच्या अंतर्भूत हिंदी राज्यसंस्थेचे आहे. म्हणजेच सावरकरांनी हिंदू हा राष्ट्रीय समाज म्हणून कितीही घोषित केला तरी व्यवहारात त्याला कसलेही विशेषाधिकार नाहीत. मुसलमानांना "न-राष्ट्रीय" असे नुसते म्हणायचे, प्रत्यक्षात ते तसे नाहीत – असा याचा अर्थ होतो. म्हणून मी म्हटले की, सावरकरांचे "हिंदुराष्ट्र" ही केवळ घोषणा होती, ते खरे हिंदुसंघटनवादीच होते.

पळशीकरांच्या मी लक्षात आणून देऊ इच्छितो की, सावरकरांचा खोलात जाऊन अभ्यास करण्याचे ज्यांनी परिश्रम घेतले आहेत त्या सर्वांपुढे ही समस्या आहे. प्रा. द.न. गोखले यांनाही हे द्वैत जाणवले आहे. "त्यांचा (सावरकरांचा) खास विरोध न्यायाने चालणाऱ्या 'हिंदी' राष्ट्रवादाला असण्यापेक्षा... 'भ्रांत हिंदी' राष्ट्रवादाला किंवा गांधीनीतीला होता," असे त्यांचे मत बनले आहे (*हिंदुत्वदर्शन*). प्रा. बाळकृष्ण कवठेकर यांनी काही वर्षांपूर्वी सावरकरांवर लिहिलेला एक हस्तलिखित निबंध माझ्या वाचनात आला होता. त्यात त्यांचेही मत सावरकरांची खरी भूमिका त्यांच्या व्याख्येपेक्षा उदार आहे असे झाले होते. (उलट, कवठेकरांशी चर्चा करताना मीच सावरकरांची हिंदुराष्ट्रवादी भूमिका मांडत होतो. कवठेकरांनी आता मला क्षमा करावी.) प्रा. शेषराव मोरे यांच्यापुढेही ही समस्या आहे. "मुस्लिम राष्ट्राचा हिंदुराष्ट्र हा पर्याय म्हणून पुढे ठेवणे व प्रत्यक्षात सर्वसमावेशक हिंदी राष्ट्राचा पुरस्कार करणे ही सावरकरांची भूमिका होती... या दोन राष्ट्रांच्या आशयात फरक नाही; स्वरूपात फरक नाही; राज्यघटनेत फरक नाही. फरक असेल तो फक्त अभिव्यक्तीत आहे", असे त्यांचे उत्तर आहे. (*सावरकरांचा बुद्धिवाद* दु.आ. ४६३) सावरकरांचे एक अभ्यासक प्रा. प्र.ल. गावडे यांनाही ही समस्या भेटलेली आहे; मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात काही वर्षांपूर्वी केलेल्या भाषणात त्यांनी ती मांडली होती. शिवाय सावरकरांवरील त्यांच्या प्रबंधात "पुण्यभू" विषयीची संदिग्धता त्यांनी प्रकट केली आहे. (*सावरकर : एक चिकित्सक अभ्यास*, १९७०). आणखी एक अभ्यासक, समाजशास्त्रज्ञ प्रा. वाय. बी. दामले यांनाही ही समस्या वाटते. (खाजगी संभाषण.)

पळशीकरांना ही समस्या भासतच नाही – कारण तशी काही जाणीव त्यांच्या लेखनात दिसत नाही. म्हणून या सर्व उलट-सुलट पुराव्यांचा अर्थ लावण्याचे परिश्रम ते घेत नाहीत. वरवर नजर टाकून जो अर्थ तो लावतात तो असा : "... सावरकरांना हिंदुमहासभेच्या राजकारणाचा भाग म्हणून तडजोडवादी, औपचारिकतः उदार भूमिका अधूनमधून मांडत्या आल्या."

हिंदुसभेच्या राजकारणाचा भाग म्हणून "अधूनमधून" सावरकरांनी औदार्य दाखविले असे दिसत नाही. पारशी, ज्यू यांच्या देशप्रेमाबद्दल त्यांना यत्किंचितही शंका नव्हती, ख्रिस्त्यांबद्दलही काही स्थानीय अपवाद वगळता त्यांची कसलीही तक्रार नव्हती, बोहरा आणि खोजा यांना "हिंदू का म्हणू नये?" हा प्रश्न त्यांना स्वतःलाच विचारावा लागला होता (आणि या प्रश्नाचे तर्कहीन अन्योन्याश्रयी - circular - उत्तर त्यांनी दिले होते) – आणि हा सर्व भाग १९२३ च्या *हिंदुत्व* ग्रंथातच आला होता. "पुण्यभू"च्या अर्थाबद्दलची संदिग्धता म्हणून मी ज्याला म्हटले आहे तीही याच ग्रंथात आहे. "हिंदी राष्ट्रीयत्वाचा" उच्चारही ह्या ग्रंथात आहे.

आणि पुढचा प्रश्न : समजा, राजकारण म्हणून उदार

अनुक्रमणिका

तडजोडवादी भूमिका मांडली तर तीही गंभीरपणे विचारात घेणे अभ्यासकाचे कर्तव्य आहे. कारण अशा तडजोडवादी सौम्य भूमिकांचाही राजकारणावर परिणाम होऊ शकतो. म्हणून कधीकधी अधिकृत भूमिकेचा तो भाग समजावा लागतो. हे सर्वांच्याच बाबतीत दिसून येते. राजकारणात, विशेषतः पक्षीय लोकशाही राजकारणात, पडल्यावर वास्तवाशी जुळवून घ्यावे लागते. विरोधी पक्ष असताना काही विशेष प्रकारची वागणूक होते, सत्ताधारी झाल्यानंतर पुन्हा वेगळ्या प्रकारची वागणूक होते. विचारांतही बदल होतो. कोणतीही विचारसरणी याच प्रक्रियेमधून पुढे जाते. त्यामुळे त्या विचारसरणीचा खरा घटक हा आणि औपचारिक घटक हा असा भेद नेहमीच करता येत नाही. मते मिळवण्यासाठी तात्कालिक म्हणून काही तडजोडी केल्या तरी मिळालेली मते टिकवण्यासाठी आणि वाढविण्यासाठी ती तडजोड चालू राहू शकते आणि विचारसरणीचा कायमचा भाग होऊ शकते. तिचे परिणाम दूरगामी असू शकतात. तेव्हा एखादी भूमिका औपचारिक किंवा तडजोडवादी म्हणून निकालात काढणे बरोबर नाही. अर्थात् हा आनुषंगिक विचार झाला. राजकारणाच्या सोयीसाठी सावरकरांनी काही व्यक्तव्ये केली हे मुळात मला मान्य नाही.

" 'आमच्या हिंदुराष्ट्रात आमच्या शर्तीवर राह्यचे कबूल असेल तर अशी भूमिका" सावरकरांची होती असे पळशीकर सांगतात. (*नभा* ६५) हे विधान जबाबदारीने केल्याचे दिसत नाही. "शर्ती" आम्ही देशाचे मालक आहोत म्हणून घातलेल्या आहेत की या बहुधर्मीय समाजाला एकूण "न्याय्य" म्हणून घातलेल्या आहेत हे पाहिले पाहिजे. मी पुनःपुन्हा सावरकरांच्या "हिंदुराष्ट्राच्या कल्पनाचित्रा"चा उल्लेख करीत आहे (*साभा* १२१-१२५) माझ्या मते ते महत्त्वाचे आहे. हिंदुमहासभेच्या अध्यक्षस्थानावर केलेल्या पहिल्या, १९३७ च्या भाषणात ते चित्र काढलेले आहे. एका अर्थाने तो सावरकरांचा "मॅनिफेस्टो" आहे. "हिंदुराष्ट्र" म्हणताना सावरकरांच्या मनात नेमके काय होते याचे स्पष्ट प्रतिबिंब सावरकर वाङ्मयात कुठे पडले असेल तर या भाषणात. आणि नाव सोडले तर हे चित्र बव्हंशी "हिंदी" राष्ट्राचे आहे. या भाषणात दिलेल्या आश्वासनांचाच पुनरुच्चार त्यांनी १९३८ च्या नागपूरच्या अध्यक्षीय भाषणात केला. सावरकरांच्या परिपक्व हिंदुत्वविचारात मी १९३७ च्या भाषणाला मध्यवर्ती स्थान देतो. या दृष्टीने सावरकरांच्या हिंदुत्वविचाराकडे पाहण्याचा पळशीकरांनी पुन्हा एकदा प्रयत्न करावा. शर्तींची "न्याय्यता" जोखताना सावरकरांच्या पुढील वाक्याचे मनन करावे. "अहिंदू देशबांधवांना जे हक्क आहेत त्यांपेक्षा अधिक हक्क आपण हिंदू आहोत किंवा बहुसंख्य आहोत ह्या विशेष कारणास्तव न मागता हिंदी नागरिक म्हणून जेवढ्यावर त्यांचा हक्क आहे तेवढ्याचीच मागणी हिंदू करीत आहेत." (*साभा* १२१)

**संघाची "वकिली"**

आता संघाची मी जी "वकिली" पळशीकरांच्या मते केली आहे त्याबद्दल. संघ हा मुळात राष्ट्रवादी शक्तीचा आविष्कार आहे असे माझे निश्चित मत आहे. उतरणीला लागलेल्या (ब्राह्मणी) मध्यमवर्गाने आपले डळमळते स्थान सावरण्यासाठी उभी केलेली यंत्रणा हे मार्क्सवादी निदान मला मान्य नाही. किंवा प्रा. मे.पुं. रेगे म्हणतात त्याप्रमाणे संघ ही अर्ध-फॅसिस्ट संघटना असून अशा संघटनांना एक अंतर्गत शत्रू उभा करावा लागतो आणि संघाने तो मुसलमानांच्या रूपात उभा केला आहे (*इंडियन सेक्युलॅरिस्ट*, जुलै-ऑगस्ट १९९७, ८३) हेही मला मान्य नाही. हिंदुत्वाचा फायदा मात्र, काही काळ, ब्राह्मणी प्रवृत्तीच्या मंडळींनी घेतला असे मला वाटते. हे वातावरण आता बदलत आहे असेही मला वाटते.

म्हणून संघाच्या मूळ हेतूबद्दल मी लिहिले होते, "तो हेतू अराष्ट्रीय शक्तींचा पाडाव करण्यासाठी राष्ट्रीय शक्ती संघटित करणे हा आहे." (*साभा* २०४) यावर पळशीकर म्हणतात, "मुसलमान समाज हीच येथील मुख्य अराष्ट्रीय शक्ती आहे, हे संघाचे दर्शन कालही होते आणि आजही आहे." (*नभा* ६६)

पुन्हा वास्तव काय हाच प्रश्न आहे. हे वास्तव नसून भ्रम आहे असे पळशीकरांनी दाखविलेले नाही.

संघाचे काही कार्यही मी जमेला धरतो. इतर अ-राष्ट्रीय शक्तींचाही, मर्यादित प्रमाणात, संघाने बीमोड केला आहे, मुख्यतः हिंदुसंघटनाच्या संदर्भात. संघस्थानावर, संघाच्या शिबिरांमध्ये "सहभोजन", "सहनिवास" इत्यादी गाजावाजा न करता त्याने जातिभेद, अस्पृश्यता यांची हकालपट्टी केली; प्रांतभेद, भाषाभेद यांना थारा न देता हिंदी व संस्कृत भाषा यांना मानाचे स्थान दिले; संपूर्ण स्वातंत्र्याचा उद्घोष काँग्रेसच्या अगोदर केला – इत्यादी.

पण संघाने सामाजिक समतेचे मूलगामी तत्त्वज्ञान मांडले नाही, समाजात जाऊन जातीयता नाहीशी केली नाही; व्यक्ति-






समष्टिसंबंधाचा संघाचा विचार फॅसिझमकडे झुकणारा आहे; धार्मिक किंवा ब्राह्मणी वळण अजूनही असर दाखविते – अशी टीका मी अनेक वेळा, अनेक ठिकाणी केली आहे. माझ्या पुस्तकातही ती आहे. (*साभा* प्र. ८; शिवाय प्र. १०, २२९-२३२)

आता मी सांगतो आहे की, संघाने धर्मनिरपेक्षतेचा अवलंब करावा, वैज्ञानिक दृष्टी स्वीकारावी, सामाजिक समतेचा निःसंदिग्ध उद्घोष करावा, स्त्री-स्वातंत्र्याचा पाठपुरावा करावा, इ. (हेही माझ्या पुस्तकात गुरुजींच्या संदर्भात आले आहे.)

आपल्या अशिलाची बाजू कशी कमकुवत आहे असे सांगणारा मी वकील!

संघाची अलीकडची "हिंदू"ची व्याख्या सर्वसमावेशक म्हणून "उदार" आहे व ती "भारतीय" या संज्ञेशी समांतर आहे असे मी म्हटले आहे. तसे का ते पुन्हा सांगतो. "प्रत्येक भारतीय पण या देशाच्या परंपरेचा मान राखणारा" असा त्या व्याख्येचा सारांश सांगता येईल. या व्याख्येत "हिंदू धर्म" नाही. उलट, कोणीही कोणत्याही दैवताची उपासना केली तरी चालेल, ती राष्ट्रीयत्वाच्या आड येत नाही, असे संघाच्या अनेक प्रवक्त्यांनी म्हटले आहे. म्हणजे धर्मस्वातंत्र्य संभाळले आहे. धर्म राष्ट्रहिताच्या आड येऊ नये असे फक्त झाले. याचा अर्थ धर्म ही खाजगी बाब ठरली. संघाला हे जाणवते की नाही हे मला माहीत नाही – जाणवत नाही असेच दिसते – पण या व्याख्येत धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाची "बीजे" आहेत असे मला वाटते. शिवाय "धर्म" काढून टाकला की संस्कृती याचा अर्थ "ऐहिक संस्कृती" असा होतो. अशी ह्या व्याख्येची फोड मी करतो.

तरीही मी, सावधपणे, "बीज-" धारणा झाल्याचेच म्हटले आहे. **सावधपणे**, कारण संघात "संस्कृती" याचा अर्थ निखळपणे ऐहिक संस्कृती असा केला जात नाही आणि संस्कृतीमागून "धर्म" डोकावतो अशी टीका केली आहे. (*साभा*, पहिली आवृत्ती, प्रास्ताविक, पाच, शिवाय १५७-७५)

शिवाय इतर वक्तव्यांत आणि वर्तनात संघ सावरकरीय हिंदू किंवा टिळकीय वैदिक हिंदू येथपर्यंत कधीकधी अर्थसंकोच करतो असेही मी दाखविले आहे. तेव्हा हीही वकिली नाही.

ही उदार व्याख्या म्हणजे संघाची "धूर्त चाल" आहे असे पळशीकरांचे मत आहे. (*नभा* ६६-६७)

माझे पहिले म्हणणे : असू दे. व्याख्येमागच्या हेतूशी माझे कर्तव्य नाही. मी वैचारिक बदलांचा आढावा घेत आहे त्यामुळे व्याख्या धूर्तच काय, अधम माणसांनी केली तरी मला चालेल. माझा विषय हिंदुत्व-विचारांचा चिकित्सक आलेख असा आहे आणि कोणत्याही व्याख्येचा व्याख्या म्हणून परामर्श घेणे हे माझे काम आहे.

दुसरे म्हणणे. 'धूर्त' म्हणायला माझ्याजवळ पुरेसा पुरावा नाही. उलट असे दिसते की, हिंदुत्ववाद्यांच्या पूर्वपीठिकेतच काहीजणांनी ही व्याख्या किंवा तिचा मथितार्थ स्वीकारलेला होता. उदा., भाई परमानंद यांचा १९१२ सालचा लेख (*साभा* १५३). बलराज मधोक १९४४ सालीच ही व्याख्या मांडीत होते. (*साभा* १५४) १९५६ साली गोळवलकर या व्याख्येच्या जवळ आले होते (*साभा* १५४)

जनता पक्षाच्या काळात १९७८ साली देवरसांनी संघाची ही एक उपटसुंभ व्याख्या म्हणून घोषित केली असती तर ती राजकारणी खेळी म्हणून कदाचित समजता आली असती. तसे झाल्याचे दिसत नाही. किंबहुना मला आता अशी शंका येते की, हिंदुत्वविचारातच, हिंदू स्वभावाशी अधिक सुसंगत असा, समावेशक हिंदुत्वाच्या संकल्पनेचा एक अंतःप्रवाह सावरकरपूर्व काळीही वाहत असावा. त्याचा अधिक शोध घेतला पाहिजे.

या संदर्भात प्रा. द.न. गोखले यांचा विचार मला महत्त्वाचा वाटतो. हिंदू समाजाची प्रकृती आणि त्याचे गतिक समन्वयवादी आहे, व्यावर्तनवादी (Exclusivist) नाही असे त्यांचे मत आहे. डॉ. श्री. व्यं. केतकर आणि राजवाडे यांनीही हे मत मांडले आहे आणि गोखले केतकरांना येथे अनुसरीत आहेत असे त्यांनीच स्वतः म्हटले आहे. "सहिष्णुता, सादृश्यवर्धन, समावेशन" ही हिंदूंची मानसिकता आहे (*सावरकर : एक रहस्य*, मौज, मुंबई, १९८९, २३३) आणि संघाची वाटचाल त्या मार्गावरची आहे असे त्यांचे मत आहे. सावरकरांच्या तुलनेने संघ अधिक यशस्वी झाला याचे रहस्य त्यांच्या मते याच गोष्टीत आहे.

सावरकर हिंदूंच्या सुप्रसिद्ध "सहिष्णुत्वा"चा गौरव करताना सहसा दिसणार नाहीत; उलट गुरुजी म्हणतात, जो सहिष्णू नव्हे तो हिंदूच नव्हे!

हे प्रकृतिधर्मही ओळखले पाहिजेत.

काही लोक संघाचे नवे हिंदुत्व ही एक राजकीय खेळी आहे असे पळशीकरांपूर्वीही म्हणत होते आणि त्यांमधल्या नूराणींचा उल्लेख करून त्यांनी दिलेला संदर्भ अस्पष्ट आहे







अनुक्रमणिका

असे मी म्हटले होते. (*साभा* १५३) हेत्वारोप करण्यापेक्षा पुरावे देणे मी अधिक पसंत करतो.

संघाची भूमिका अनुदार किंवा कट्टर आहे असे पळशीकर म्हणतात ते बरोबर आहे. *भूमिका* निराळी आणि *व्याख्या* निराळी. *व्याख्या* उदार आहे. असे माझे म्हणणे आहे. " 'उदार' व्याख्या संघ-परिवार पुढे ठेवीत आहे ती वस्तुतः उदार नाही," हे पळशीकरांचे म्हणणे (*नभा*. ६७) चूक आहे. *भूमिकेत* व्याख्येव्यतिरिक्त इतर विचार, वक्तव्ये, कृती इत्यादींचा समावेश होईल. हा फरक पळशीकर लक्षात घेतील अशी आशा आहे. नेमकी टीका करायची तर व्याख्येला छेद देणाऱ्या वक्तव्यांवर व वर्तनावर केली पाहिजे. तशी मी केली आहेच.

संघ आता "भारतीय" शब्दही दुटप्पीपणे वापरतो आहे असे पळशीकर म्हणतात. हे अशक्य आहे. कारण "भारतीय" शब्दाला एकच अर्थ आहे. हिंदू शब्दाचे (निदान) दोन अर्थ प्रस्थापित झाले आहेत. एक "हिंदु-धर्मीय" व दुसरा संघाने दिलेला (आणि सुप्रीम कोर्टाच्या पीठांनी समर्थित केलेला) व्यापक "हिंदी" किंवा "भारतीय" असा अर्थ. "हिंदू" शब्द उच्चारताना तो कोणत्या अर्थाने वापरला आहे हे स्पष्ट केले नाही तर दुटप्पीपणाचा आरोप घेण्यास जागा उरते. तसे "भारतीय" या शब्दाचे नाही.

हा शब्दच्छल वाटेल. पण तसे करणे गरजेचे आहे. कारण असे की, माझ्या दृष्टीने व्याख्या महत्त्वाच्या आहेत, त्यांचे उगम नाहीत हे स्पष्ट व्हावे.

तीन. नवी व्याख्या मनापासून केलेली नाही, धूर्तपणाचा तो आविष्कार आहे असे समजले तरी ती अधिकृतपणे मांडण्यात आली आहे हे सत्य उरतेच. या व्याख्येबद्दल आपल्याला संघाला जबाबदार धरता येते. त्याच्या विसंगती उघड्यावर आणता येतात. (पुरावा असेल तर धूर्तपणाचा आरोपही करता येईल.) हाही एक विचारप्रक्रियेच्या दृष्टीने लाभ नाही का?

चार. ज्या धूर्तपणाची व्यवहारातली उदाहरणे पळशीकर देतात ती बाबरी मशिदीचा विध्वंस इत्यादी. याबाबत माझे म्हणणे असे. जनसंघाच्या सुरुवातीपासून उदार-अनुदार अशी संघपरिवाराच्या भूमिकेतली आंदोलने दाखवता येतील. बाबरी मशीद वगैरे प्रकरणांतली आजची अनुदारता अनेक घटकांमुळे निर्माण झालेली आहे. त्यांमधला एक प्रमुख घटक म्हणजे गेल्या सुमारे दहा वर्षांत संघ-परिवाराचे लक्ष सत्ताग्रहणाकडे लागलेले आहे. "हिंदू मतपेढी" सत्ताग्रहणाच्या वाटेवर उपयोगी पडते असे संघपरिवाराला (विशेषतः भाजपला) वाटते. त्यामुळे उत्पन्न झालेली अनुदारता तात्कालिक आहे असेही म्हणता येईल. मी खात्री देऊ शकणार नाही. पण सर्व शक्यता नजरेसमोर ठेवल्या पाहिजेत. आजच (जून १९९८) याची काही पुरश्चिन्हे भाजपच्या नेत्यांच्या वक्तव्यांत दिसू लागली आहेत.

पाच. एखाद्या उदार भूमिकेला वातावरणातून कितपत प्रतिसाद मिळतो यावरही तिचे स्थैर्य अवलंबून असते. संघाच्या नव्या व्याख्येचे स्वागत पुरोगामी विचारवंतांकडून झालेले मला दिसून आलेले नाही. "ही तुमची व्याख्या ना? आम्हांला ती पसंत आहे. मात्र तुमच्याबद्दल आमच्या मनात संशय आहे. तुम्ही वर्तनाने तुमचे औदार्य सिद्ध कराल आणि खरोखरच धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचे बीजारोपण कराल तर आम्ही तुमचे अभिनंदन करू" असे त्यांना म्हणता आले असते. राजकारणी असे म्हणाले नसते. पण विचारवंतांनी असे म्हणणे जरूर होते. तसे काही झाले नाही. शिवाय मुसलमानांचा प्रतिसादही शून्य हे आहेच.

माझ्या पुस्तकात (*साभा* १७०-१७१) संघाच्या *मुस्लिम बांधवांशी हितगुज* व *ख्रिस्ती बांधवांशी हितगुज* या दोन प्रकाशनांचा उल्लेख आहे. ही प्रकाशने जनता पक्षाच्या काळातलीच आहेत. संघाच्या "उदार" व्याख्येवर जणू एक विस्तृत भाष्यच म्हणावे असे या पुस्तिकांचे स्वरूप आहे. यांत मिश्र संस्कृती आहे, थोर पूर्वजांच्या परंपरेत अहिंदूंची नावे आहेत, मिश्र आणि अ-धार्मिक उत्सव-समारंभांची योजना पुढे केलेली आहे, स्वेच्छेने झालेल्या धर्मांतराचे स्वागत आहे. संघाचे एकात्मता स्तोत्र रोज सर्व देशभरच्या शाखांवरून म्हटले जाते तेही याच काळात निर्माण झाले आणि त्यातली व्यक्तिनामावली समावेशक आहे. (*सांभा* २०८-२०९)

संघामध्ये हा जो बदल घडून येत होता, हे जे एक पाऊल पुढे पडत होते त्याला संघाबाहेरच्या विचारवंतांनी कितपत प्रतिसाद दिला?

दोन्ही *हितगुजे* आणि एकात्मता स्तोत्र अजूनही पूर्णपणे जुन्या वळणाच्या बाहेर पडलेली नाहीत. पण बदल होताना असेच होतात. मनाच्या आणि बुद्धीच्या सवयी एकदम मोडत नाहीत. पण जो काही बदल घडून आला त्याबद्दल स्वागतशीलता दिसायला हवी होती.

हे संघपरिवाराच्या वर्तनाचे समर्थन नाही, स्पष्टीकरण आहे. समर्थन मी कधीच करणार नाही. पण मी हेही भान






राखीन की, बदलत्या भूमिकांना काही सामाजिक-राजकीय कारणे असतात. अभ्यासकाने त्यांचा छडा घ्यायचा असतो. देशाचा गाडा योग्य दिशेने जायचा तर केवळ एका पक्षाच्या किंवा संघटनेच्या माथ्यावर सर्व पापे लादून चालत नाही. असा विवेक मला दुर्दैवाने पळशीकरांच्या लिखाणात दिसत नाही.

सामाजिक व्यवहारात धूर्तपणा असू शकतो, धूळफेक असू शकते, लवाडी असू शकते. या घटकांचे अस्तित्वच नसते असे मी मानीत नाही. जगाच्या इतिहासात अशी उदाहरणे आहेतही. माझा आग्रह एवढाच आहे की जोपर्यंत असा पुरेसा पुरावा उपलब्ध होत नाही तोपर्यंत माणसे सभ्य आहेत असे समजून चालावे.

मी संघाची 'कड' घेतो, 'तळी' उचलतो, त्याला 'चुचकारतो', 'पुष्टी' देतो म्हणजे काय करतो? व का? या बाबतीतली माझी भूमिका मी स्पष्ट करू इच्छितो.

मुळात संघ राष्ट्रवादी आहे अशी माझी धारणा आहे आणि राष्ट्रवाद मला गरजेचा एवढेच नव्हे तर निकडीचा वाटतो. देशाचे अखंडत्व राखणे, त्याला समर्थ करणे, त्याचा सन्मान वाढेल असे करणे या, समाज म्हणून आपल्याला टिकायचे असेल तर, आजच्या प्राथमिक गरजा आहेत.

याची जाणीव आपल्या लोकनेत्यांना होतीच. आपण सर्व 'हिंदी' आहोत आणि हिंदी म्हणून राहिले पाहिजे या व्यापक आणि धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचे बीज त्यांनी रोविले.

पण पुढे या राष्ट्रवादाला एका गटाचा अनुनय करण्याची सवय लागली. सावरकर ज्याला 'सूडो-नॅशनॅलिझम' म्हणाले त्याचा उदय झाला. यात धर्मनिरपेक्षता राहिली नाही. (तशी राहिली असती तर सावरकरांचे सर्वच चरित्र वेगळे झाले असते. ते स्वतः म्हणाले त्याप्रमाणे ते कदाचित काँग्रेसमध्ये गेले असते.)

सावरकरांनी केवळ सूडो-नॅशॅलिझमवर शरसंधान केले असते आणि हिंदुराष्ट्राची भूमिका घेतली नसती तर ती अधिक तर्कसंगत झाली असती आणि राष्ट्रवादाच्या विकासाला अधिक निकोप वळण लागले असते असे म्हणता येईल का?

या बाबतीत मला असे वाटते की, सावरकर आणखी एक कार्य करीत होते आणि ते म्हणजे राष्ट्रवादाच्या मूलद्रव्यांची चिकित्सा. त्यांच्या लक्षात येत होते की, केवळ ब्रिटिश- विरोध व एकत्र निवास या गोष्टी एकात्मीकरणाला पुरेशा नाहीत. काही चिरंतन स्वरूपाचे भावनिक बंध हवेत. हे बंध सावरकरांच्या मते मुख्यत्वे बहुसंख्य आणि पुरातन अशा हिंदुसमाजाच्या परंपरेत सापडण्यासारखे होते.

पण 'मुख्यत्वे' ही सावरकरांची भूमिका राहिली नाही; 'एकमात्रपणे' असे तिचे स्वरूप झाले. येथे पळशीकर म्हणतात ती 'जातीयता' आली.

सावरकरांनी येथल्या संस्कृतीत अहिंदूंचे काही योगदान आहे हे नाकारले. समावेशक ऐहिक संस्कृतीचे विविध घटक त्यांनी लक्षात घेतले असते तर आणि त्यांना अनुसरून देवाण-घेवाण केली असती तर त्यांच्या राष्ट्रवादाला जातीय स्वरूप आले नसते.

ही चूक अंशतः तरी संघाने दुरुस्त केली आहे असे मला वाटते. उपासनापंथ-निरपेक्ष अशा हिंदुत्वाची संकल्पना पुढे मांडून, जातीयता टाळून; मधून-मधून तरी देवाणघेवाणीची भाषा करून.

पण संघाची भूमिका व्यवहारात अनेकदा जातीयच राहिली. त्यामुळे विचारांतही स्पष्टपणा राहिला नाही.

साक्षेपी धर्मनिरपेक्षता, ऐहिक संस्कृति-सापेक्षता, आधुनिक मूल्ये यांचा प्रवेश संघाच्या राष्ट्रवादात झाला तर एक नवे पान उलटले जाईल असे मला वाटते.

मी संघाची 'कड' घेत नाही; त्याचा, जमेल तेवढा, अभ्यास करतो, स्वागतार्ह वाटणाऱ्या बदलांचे स्वागत करतो, टीकार्ह गोष्टींवर टीका करतो. हे सर्व करताना मी आवाहने करतो ती मुख्यतः हिंदुत्ववाद्यांना, त्यातही संघपरिवाराला – कारण हिंदुमहासभा अशी फारशी काही राहिलेली नाही – असे म्हणणे योग्य होईल. पण हे कड घेणे नव्हे.

एकराष्ट्रीयता, अखंडता, समान नागरी कायदा, काश्मीरच्या खास दर्जाचा शेवट, संरक्षणक्षमता, या भाजपच्या कार्यक्रमाला माझा पाठिंबा आहे. दुसरा कोणताही पक्ष किंवा संघटना ही भूमिका मांडीत नाही. म्हणून नव्या प्रकारच्या राष्ट्रवादाचा उदय व्हायचा असेल तर तो बहुधा याच कुळात होईल अशी माझी – कदाचित भाबडी – धारणा आहे. संघही मुस्लिम-तुष्टीकरणाच्या मागे लागला आहे अशी टीका आता काही त्यातलीच मंडळी करू लागली आहेत. (पाहा, माझा लेख "संघपरिवार व मुस्लिम प्रश्न", *महाराष्ट्र टाइम्स*, १२-१२-९७) तसे झाले तर माझा संघावरचा विश्वास संपेल.

पण माझा राष्ट्रवाद केवळ संघापुरता नाही. मी आवाहन संघाला करतो याचे कारण ती एकमात्र राष्ट्रवादी प्रवृत्ती मला



अनुक्रमणिका

देशात दिसते. ती इतरत्र दिसू लागली तर ते आवाहन त्यांनाही ठरेल.

आर्थिक धोरणे, शैक्षणिक धोरणे पक्षनिहाय, संस्थानिहाय वेगळी असू शकतात. पण राष्ट्रवाद म्हणजे राष्ट्र म्हणून हा देश उभा राहणे हे उद्दिष्ट सर्वांचेच असले पाहिजे. दुर्दैवाने आज स्थिती तशी नाही म्हणून माझा श्रोतृवर्ग मी तरी संघपरिवाराचा म्हणून ठेवलेला दिसेल. पण विचार सर्वांसाठी आहेत.

संघात कसलाही बदल होणार नाही अशी पळशीकरांची मूलभूत श्रद्धा आहे. "स.हं.ना अपेक्षित धर्मनिरपेक्षतेची भूमिका संघपरिवाराने अंगीकारणे म्हणजे स्वतःच्या अस्तित्वाचे मुख्य प्रयोजनच नाकारणे ठरेल" (*नभा* ७१), "हा आलोक स्वीकारला तर संघपरिवाराचा कणाच मोडतो व पायाखालची भूमीच सरकते" (*नभा* ७१) सावरकर व संघ यांची "मूलतत्त्ववादी कट्टर जातकुळी" आहे (*नभा* ७०) अशी त्यांची वाक्ये आहेत. एवढेच नव्हे तर संघ ही एक दुष्ट, विषारी प्रवृत्ती आहे, ती सामोपचाराचे बुरखे घेत असल्यामुळे जास्त धोक्याची आहे, असे त्यांचे मत असावे असे दिसते. संघाची "उदारता" म्हणजे "रेशमी हातमोजा" आहे; त्याच्या आत खरोखर एक "पोलादी पंजा" आहे असे त्यांनी म्हटले आहे. (*नभा* ६७)

ही घबराट अकारण आहे असे मला वाटते – जोपर्यंत पळशीकर कारणे देत नाहीत तोपर्यंत. पोलादी पंजा वगैरे तूर्त बाजूला ठेवू. संघ बदलेल का, म्हणजेच माझ्या विचारांचे त्यात स्वागत होईल का? या प्रश्नाचे उत्तर पळशीकर म्हणतात त्याप्रमाणे नकारार्थी असू शकेल, नाही कुणी म्हणावे? देणाराने देत जावे! विचारांची उपयुक्तता ते ऐकणारे किती यावर अवलंबून नाही.

पण मी इतका निराश नाही. माणूस परिवर्तनक्षम असतो आणि माणसांच्या संस्थाही; त्यांमधून संघ तेवढा बाहेर काढणे कितपत योग्य हे पळशीकरांनी ठरवावे.

धर्मनिरपेक्षतेची शर्त संघ "एकतर्फी" लावत आहे, – म्हणजेच अहिंदूंनी आपल्या धर्मांचे "संक्षेपण" करून घ्यावे, हिंदूंना मात्र तसे करण्याची गरज नाही – असा पळशीकरांचा आक्षेप आहे. (*नभा* ६७)

असे कुणी म्हटल्याचे माझ्या पाहण्यात नाही. उलट, माझ्या पुस्तकात तेव्हाचे भाजपचे अध्यक्ष मुरली मनोहर जोशी यांचे आश्वासन उद्धृत केले आहे : "... विविध नागरी कायद्यांचा तसाच उत्तराधिकारांचा अभ्यास केल्यावर जो कायदा सर्वश्रेष्ठ म्हणून तयार होईल तोच भारतासाठीही तयार करावा लागेल." (*साभा* १७४) हिंदू कायदा लागू होणार नाही असेही त्यांनी स्पष्ट म्हटलेले आहे. अलीकडे अडवानी यांनी पुढील वक्तव्य केले आहे : "विधि-नियोगामार्फत (लॉ कमिशन) हिंदू, मुस्लिम, पारशी, ख्रिश्चन आणि इतर धर्मांचे वैयक्तिक कायदे (पर्सनल लॉ) अभ्यासण्यात येतील. या वैयक्तिक कायद्यांमधील सर्वोत्तम ते निवडून त्यांवरून कौटुंबिक मूल्ये आणि महिलांना न्यायाची वागणूक यांच्या दृढीकरणासाठी समान नागरी कायदा तयार करण्यात येईल." (*टाइम्स ऑफ इंडिया*, जाने. ५, १९९८)

धर्मनिरपेक्षता केवळ अहिंदूंसाठी असे कुणा मान्य वा अधिकृत प्रवक्त्याने म्हटले असेल तर पळशीकरांनी ते माझ्या ध्यानात आणून द्यावे.

"एकतर्फी शर्त" म्हणताना पळशीकरांनी एक चमत्कारिक वाक्य लिहिले आहे. त्याचा अर्थ नीटसा कळत नाही; जो अर्थ कळतो असे वाटते तो विस्मय उत्पन्न करणारा आहे. ते वाक्य असे : "... जे धर्म हे केवळ संप्रदाय किंवा उपासनेचे वेगळे प्रकार नाहीत, त्यांनी स्वतःचे संक्षेपण करून घ्यावे ही एकतर्फी शर्त झाली." (*नभा* ६७)

"जे" धर्म असे म्हणण्याचे खरे म्हणजे कारण नाही, कारण सर्वच प्रमुख धर्म उपासनापद्धतीपलीकडे जाऊन जीवनव्यवहाराचे नियमन करू पाहतात. कमी-जास्त मात्रेचा तेवढा फरक असतो. तेव्हा धर्मनिरपेक्ष राज्यात "संक्षेपण" होणार ते सर्वच धर्मांचे – म्हणजेच सर्व धर्म ही त्या-त्या व्यक्तींची खाजगी बाब ठरणार. अर्थात यात एकतर्फीपणा नाही.

पण पळशीकरांना हे माहीत नाही असे म्हणता येणार नाही. तेव्हा शंका अशी येते की, "जे" धर्म म्हणताना इस्लामसारखे सर्व जीवनाचे कटाक्षाने नियमन करणारे व अपरिवर्तनीय म्हणून समजले गेलेले धर्म त्यांच्या मनात असावेत. पण अशा धर्मांचे संक्षेपण धर्मनिरपेक्ष राज्यसंस्थेच्या तत्त्वातच अनुस्यूत आहे. जे धर्म केवळ उपासनापद्धतीपुरते सीमित आहेत त्यांच्या संक्षेपणाचा प्रश्नच येणार नाही. गुन्हा करणारालाच शिक्षा होणार; इतरांना कशी होईल? मग संक्षेपणाबद्दल तक्रार करणे म्हणजे धर्मनिरपेक्षता नाकारणे, प्रत्येक जीवनव्यापी धर्माच्या अनुयायांना त्यांचे वेगळे कायदे पाळू देणे होय. पळशीकरांचे विधान विस्मित करणारे आहे असे मला वाटते ते या अर्थाने.

अनुक्रमणिका








**"हिंदू जीवनमूल्ये"**

मी संघाची चाल "चलाख" आहे असे म्हणत नाही; पण "हिंदू जीवनमूल्ये" या शीर्षकाखाली ८ व्या प्रकरणात मी जी चर्चा केली आहे ती ही "चलाखी" उघड करते असे पळशीकरांचे म्हणणे आहे. (*नभा* ६७)

"हिंदू जीवनमूल्ये" म्हणून संघ ज्यांना म्हणतो त्यांत पाश्चात्त्याचा पाश्चात्त्य म्हणून धिक्कार, भूतदया, अध्यात्म, सहिष्णुता यांचा समावेश होतो. सामाजिक दृष्टीने महत्त्वाची मूल्ये म्हणजे व्यक्ति-समष्टिसंबंध, स्त्री-पुरुष-संबंध आणि वर्ण-व्यवस्था ही आहेत. व्यक्तिसमष्टिसंबंधाचे तत्त्वज्ञान फॅसिझमकडे झुकते, स्त्रीपुरुष-संबंधांबद्दलची भूमिका पुरुषवर्चस्ववादी आहे आणि वर्णव्यवस्थेचा "आडपडद्याने" गौरव केला जातो – अशी माझी टीका आहे. (*साभा* १९९)

या साऱ्या भूमिका प्रतिगामी आहेत हे खरे पण त्या "मुस्लिमविरोधी", "आक्रमक", "जातीयवादी" नाहीत. ही मूल्ये फक्त मुसलमानांवर लादायची असा संघाचा विचार नाही. ही त्यांनी सर्व समाजासाठी मांडलेली आहेत म्हणून ती काही एका अर्थाने "आक्रमक" ठरवली तर सर्व भारतीयांवर आक्रमण करणारी आहेत.

**मंदिर-मशीद वाद**

आक्रमकपणाच्या संदर्भात पळशीकरांनी बाबरी मशीद विध्वंसाचा उल्लेख केला आहे. (*नभा* ६८) संघपरिवाराला आजकाल अधिक जोराने आक्रमक म्हटले जाते त्याचे कारणही हेच आहे. या घटनेबद्दल मला काय वाटते ते सांगतो.

मुळात हा प्रश्न भाजपने हाती घ्यायला नको होता असे माझे मत आहे, कारण राम आणि मंदिर ही धार्मिक प्रतीके आहेत आणि धर्मनिरपेक्ष राज्यात ती वापरता कामा नयेत. माझी सूचना अशी होती की, भाजपने मुसलमानांच्या प्रतिनिधींकडून समान नागरी कायद्याला संमती घ्यावी आणि मंदिर आंदोलन मागे घ्यावे (*साभा* २१०-२१२). भाजपच्या आणि एकूणच संघपरिवाराच्या व्यापक हिंदुत्वाच्या तत्त्वाशी हे आंदोलन विसंगत असल्याचीही टीका मी केली होती.

दुसरी टीका अशी की या प्रकरणी कायदा हातात घेतला गेला. सनदशीर मार्गाने चळवळ चालायला हवी होती.

मात्र हिंदूंच्या बाजूच्या या दोन चुका मान्य केल्यानंतर पुढे मला असे म्हणायचे आहे की मुसलमानांनी आणि पुरोगामी विचारवंतांनी या आंदोलनाबाबत वेगळी आणि माझ्या मते समजुतीची, शहाणपणाची भूमिका घेतली असती तर पुढचे अनर्थ टळले असते.

मुख्य वस्तुस्थितीचा मुद्दा म्हणजे या जागेवर राममंदिर होते की नाही आणि ते पाडून मशीद बांधण्यात आली की नाही हा. या विषयाच्या थोड्याफार अभ्यासावरून मला असा निष्कर्ष योग्य दिसतो की, एक मंदिर होते, अयोध्येत आणि उंच जागी असल्यामुळे रामाचे ते असणे अधिक संभाव्य आहे. रामजन्म त्या जागी झाला की नाही हे विवाद्य आहे. शिवाय या प्रश्नावर गेल्या काही शतकांत ८०-८२ संघर्ष झाले होते असाही इतिहास लक्षात घेतला पाहिजे. आज वाजपेयीही "एक मंदिर होते" असे म्हणत आहेत (*टाइम्स ऑफ इंडिया*, ८-१-९८). ही "सवलत" असली तरी स्वागतार्ह आहे.

पंतप्रधान चंद्रशेखर यांनी हिंदू-मुसलमान प्रतिनिधींना एकत्र आणून जे वाद घडवून आणले त्यांत मुसलमान प्रतिनिधींना त्यांच्या बाजूचा सज्जड पुरावा सादर करताच आला नाही. शिवाय या सभांबाबत त्यांनी टाळाटाळ केली.

वि.हिं.प. तर्फे मशीद जशीच्या तशी हलवून इतरत्र उभी करण्याची तयारी दाखवण्यात आली होती. तिला प्रतिसाद मिळाला नाही. नवी मशीद उभारण्याचा संपूर्ण खर्च करण्याचीही वि.हिं.प. ची तयारी होती.

स्वतःच्या जबाबदारीवर (भा.ज.प.चा प्रवक्ता म्हणून नव्हे) अटलबिहारी वाजपेयींनी मुसलमानांनी वादग्रस्त स्थळावरचा हिंदूंचा हक्क नुसता मान्य करावा, आंदोलन मागे घेण्यासाठी सहकाऱ्यांचे मन आपण वळवू, असा तोडगाही सुचवला होता पण त्यालाही प्रतिसाद मिळाला नाही.

ज्या हिंदूंबरोबर आपल्याला एकत्र राहायचे आहे त्यांच्या धार्मिक भावनांचा आदर करावा अशी मुसलमान प्रतिनिधींची वृत्ती कोणत्याच टप्प्यावर दिसून आली नाही. त्यांना अनेक मार्ग मोकळे होते. १. बाबरी मशीद देऊळ पाडून झाली हे ऐतिहासिक सत्य नाही याच कारणासाठी हिंदूंची मागणी मान्य नसेल तर जेथे देवळे पाडून मशिदी उभारण्यात आल्याचे पुरावे आहेत अशा एखाद्या ठिकाणची मशीद (उदा., काशी विश्वेश्वर) त्यांना देऊ करता आली असती. २. कमीत कमी वाजपेयींच्या आवाहनाला प्रतिसाद देता आला असता. ३. देशावर प्रेम व्यक्त करणारी आणि हिंदू बांधवांबरोबर शांततामय सहअस्तित्वाची इच्छा दर्शविणारी दुसरी एखादी

गोष्ट करता आली असती, उदा. समान नागरी कायद्याला निदान तत्त्वतः तरी मान्यता देता आली असती. ४. आमच्या पूर्वजांनी चुका केल्या असेसुद्धा कुणी म्हणाले नाही; तसे म्हणता आले असते.

थोडक्यात, आपल्या भूमिकेपासून एक इंचही मागे हटायचे नाही असा पवित्रा मुसलमान पुढाऱ्यांनी घेतला होता. मुजोरी म्हणतात ती ही. आपल्या अलगपणाची त्यांनी पुन्हा एकदा ग्वाही दिली.

सर्व पुरोगामी मंडळींनी मुसलमानांच्या अडेलतट्टू धोरणालाच साथ दिली.

यामधून पुढचे प्रकरण घडले.

हे जे घडले त्यावद्दल आता काय विचार करावा? (१) वावरी मशिदीच्या विध्वंसाची एक घटना इतिहासात आणि आजही मुसलमान देशात, पाडल्या गेलेल्या व पाडल्या जात असलेल्या, शेकडो मंदिरांच्या आणि इतर अत्याचारांच्या परिप्रेक्ष्यात पाहावी. शिवाय हे प्रकरण पेटण्याच्या आधीच्या काही वर्षांत जी राजकीय स्तरावर घटनांची साखळी तयार झाली (उदा., शहावानो प्रकरण, बोट क्लव रॅली, रथयात्रा, शिलापूजन, मंडल इ.) तिचाही या परिप्रेक्ष्यात समावेश करावा. असे केले म्हणजे इतिहासाच्या ओघातले या घटनेचे स्थान लक्षात येईल. (२) दुसरा एक परिप्रेक्ष्य असा की, मशिदीचा विध्वंस हा "सेक्युलॅरिझमच्या मुळावर घाव" असेल तर शहावानो प्रकरणात बदललेला कायदा आणि सर्वच पक्षांनी आजवर घातलेले घाले यांचाही विचार करावा. (३) वाईटातून चांगलेही कधीकधी निघते म्हणतात. त्याप्रमाणे हा धक्का बसल्यावर काही मुसलमान तरी जरा आत्मनिरीक्षण करू लागले ही घटना ध्यानात घ्यावी. (४) शिया पंथीयांचा संघपरिवाराला विरोध नव्हता हेही ध्यानात घ्यावे.

हे सर्व लक्षात घेतले म्हणजे बाबरी मशीद पाडली म्हणून ऊर पिटीत बसण्याचा जो प्रकार अनेक मंडळी नियमितपणे आजतागायत करीत आली आहेत तो त्यांनी सोडून देऊन अशा घटना पुन्हा घडू नयेत यासाठी सक्त धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाची मांडणी कशी करता येईल याचा विचार करावा.

माझी भाषा पुन्हा एकदा पळशीकरांना आक्रमक वाटेल. ती आक्रमक किंवा आक्रमणाला सूचकतेने आवाहन करणारी नाही. धक्का बसल्यावर काही मंडळी आत्मनिरीक्षण करू लागली असे मी म्हणतो तेव्हा धक्के देत राहावेत असे मला सुचवायचे नाही. आणि विध्वंस मी क्षम्यही मानीत नाही. माझी भूमिका प्रारंभी सांगितलीच आहे. पण आज विचार करताना या दुर्दैवी घटनेला आपल्या विचारात किती स्थान द्यावे, तिच्यावरून कोणते निष्कर्ष काढावे, धर्मनिरपेक्षतेचा उपदेश कुणी कुणाला करावा, पापाच्या दुःश्रेयाची विभागणी कशीकशी करावी, इत्यादींबद्दल शांत मनाने विचार करण्याची वेळ आलेली आहे असे मला सुचवावेसे वाटते.

### पुरोगाम्यांवर खापर

हिंदुत्ववादी ताठर व कडवे होतात याचे एक कारण हिंदुत्ववाद्यांनी आपल्या विकासक्रमात जी समावेशक राष्ट्रवादी भूमिका घेतली आहे तिचे स्वागत पुरोगामी विचारवंतांनी केले नाही अशी तक्रार करताना "..... मुस्लिम प्रश्नच डोळ्यांना न दिसण्याइतके अंधत्व त्यांनी स्वखुषीने स्वीकारलेले आहे", असे मी लिहिले होते आणि हिंदू अधिक कडवे झाले तर त्यांची "वह्वंश" जवावदारी पुरोगाम्यांवर राहील असे मी म्हटले होते. (*साभा* २२९) वह्वंश हा शब्द आता मी मागे घेतो. "आंशिक" हा शब्द मी आता उपयोजीन. मात्र पुरोगामी विचारवंतांचे या वावतीत "अंधत्व" आहे असे मला निश्चितच वाटते. स्वतः पळशीकरांचे वर्णन "पुरोगामी" असे मी करणार नाही. अनेक विषयांच्या संदर्भात आजपर्यंत त्यांनी ज्यांना प्रस्थापित "पुरोगामी" भूमिका म्हणतात त्या घेतलेल्या नाहीत. उदाहरणार्थ, महात्मा फुले व डॉ. आंवेडकर यांच्यावद्दल आपल्या स्वतंत्र बुद्धीला जे पटते ते ते स्वच्छपणे म्हणतात याचे किंवा अशासारखे प्रत्यंतर मला अनेक वेळा आलेले आहे आणि *नवभारत*च्या प्रस्तुत अंकातही आहे. ("महात्मा फुले यांची शिकवण" हा पत्रव्यवहार, *नभा*. ७३-७७ पाहा.) मात्र मुसलमान प्रश्ना-बावतच्या 'अंधत्वा'त तेही सामील आहेत असे मला वाटते. हे पुरोगामी अंधत्व हिंदुत्ववाद्यांच्या कडवेपणाचे अंशकारण निश्चितच आहे हे मागे सांगून झालेच आहे.

### हिंदू मानसिकतेचे दर्शन

"....मुस्लिम प्रश्नाच्या तोंडवळ्याचाच एक गंभीर व उग्र असा 'हिंदू प्रश्न' मौजूद आहे" व त्याचीही चिकित्सा मी करायला हवी होती असे पळशीकरांचे म्हणणे आहे. (*नभा* ७१)

"हिंदू प्रश्न" मुस्लिम प्रश्नाच्याच "तोंडवळ्या"चा आहे की नाही ही गोष्ट अलाहिदा; पण मुस्लिम व ख्रिश्चन संस्कृतींना

हिंदू समाजाचा प्रतिसाद, त्यांच्या क्रिया-प्रतिक्रिया हा एक सखोल अभ्यासाचा विषय आहे यात शंका नाही.

तूर्त एवढेच म्हणतो की, या सर्व प्रकरणी पळशीकरांच्या मते मुसलमानांइतकेच किंवा त्यांच्याहूनही अधिक दोषभाक् हिंदू असतील तर तशी समग्र मांडणी पळशीकरांनी करावी म्हणजे कोणते मुद्दे महत्त्वाचे आहेत हे लक्षात येऊन अभ्यासाला दिशा मिळेल.

मात्र जातपात, स्पृश्यास्पृश्यता, स्त्रियांना मिळणारी वागणूक (*नभा* ६३) अशा हिंदुसंघटनाच्या आड येणाऱ्या गोष्टींविषयी मी पुरेसे लिहिले आहे असे मला वाटते. संघाच्या संस्कृतीविषयक कल्पनेच्या चर्चेत, विशेषतः गुरुजींच्या मतांच्या संदर्भात मी ही टीका केली आहे. (वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था, स्त्रीचे स्थान, *साभा* १९१-१९६). सावरकरांच्या हिंदुत्वाच्या सामाजिक आशयावर एक संपूर्ण प्रकरण आहे (*साभा* प्र. ६) मुसलमानांवरच फार टीका आहे तेव्हा तोल राखण्यासाठी हिंदूंवरही भरपूर टीका केलीच पाहिजे असे मानण्यामागेही एक "हिंदू (पुरोगामी) मानसिकता" आहे तिचा प्रत्यय पळशीकरांच्या अशा टीकेमधून येतो हे मात्र सांगायला हवे. पण यावद्दल आणखी पुढे.

### आंबेडकर, श कु द यांचा "वापर"

सावरकरीय व संघीय हिंदुत्ववादाला "समर्थन" प्राप्त करून देण्यासाठी या विचारवंतांचा "वापर" मी केला आहे असे पळशीकर म्हणतात.

चूक. या सर्वांचा मी *उपयोग* केला आहे आणि तो मुख्यतः मुस्लिम प्रश्नाच्या विश्लेषणाच्या बाबतीत.

आंबेडकरांना एका काळी हिंदुसंघटनाची गरज वाटत होती हे मी साधार दाखविले आहे. हे चित्र "खोटे नाही" असे पळशीकरांचे स्वतःचेच मत आहे. (*नभा* ६८)

श कु द यांच्या लेखनातून हिंदुसंघटन सूचित होते पण ते हा निष्कर्ष काढीत नाहीत अशी माझी त्यांच्यावर टीका आहे. म्हणजे, त्यांनी हिंदुत्वाचे (हिंदुसंघटनाचे) समर्थन करायला हवे होते, पण केले नाही अशी ही टीका आहे.

एकूण यात कसलाही 'गैर' वापर नाही.

पळशीकरांचा एक मुद्दा असा आहे की, श कु दंच्या विचारांची "चिकित्सक तपासणी" मी केली नाही (*नभा* ६२). मी या तिघांच्या विवेचनाची चिकित्सा केली नाही, म्हणजे त्यांच्यावर टीका केली नाही, याचे कारण त्यांच्या मुस्लिम प्रश्नाच्या विश्लेषणावर टीका करण्यासारखे मला काही दिसले नाही. अधिक अभ्यासानंतर असे काही दिसले तर अवश्य टीका करीन. या तिघांच्या "पुरोगामी उत्तरां"वर मी टीका केलीच आहे कारण तेथे त्यांच्या भूमिका मला टीकास्पद वाटल्या. पण दुसऱ्या एका रीतीने मी श कु दंवर "अन्याय" करीत आहे असा पळशीकरांचा आरोप आहे.

हिंदू-मुस्लिम प्रश्नावर हिंदुसंघटन हेच तर्कशुद्ध उत्तर आहे असे श कु दंच्याच विवेचनावरून लक्षात येते, किंबहुना हे तिघेही या उत्तरापर्यंत येतात पण ते स्पष्टपणे मांडीत नाहीत – अशी माझी टीका होती. पळशीकर म्हणतात, "... ज्या बुद्धिवादाचा पुरस्कार स.ह. करतात त्या अर्थाने हे तिघेही बुद्धिवादी असूनही त्यांनी हिंदुत्ववादी भूमिका का अंगीकारली नाही?" – याची तपासणी मी नीट केली नाही (*नभा* ६२). "(त्यांची) मुस्लिम प्रश्नाची मांडणी जरी सारखीच दिसत असली तरी, हिंदुसंघटन, हिंदुत्ववाद, हिंदुराष्ट्रवाद यांना तेवढाच ठाम नकार कसा तर्कसंगत आहे हे स.हं. नी स्पष्ट केले नाही हा अन्याय आहे."

पळशीकरांची ही विधाने आश्चर्यकारक आहेत. पहिली गोष्ट म्हणजे बुद्धिवाद आणि तर्क यांचा त्यांनी गोंधळ केला आहे. बुद्धिवाद ही एक जीवनदृष्टी आहे; सृष्टीचे ज्ञान होण्यासाठी मानवी बुद्धी हे एकमात्र साधन आहे असे ही दृष्टी सांगते. आता श कु द हे बुद्धिवादीही होते आणि बुद्धिमानही होते. पण अशी माणसेही एखाद्या वेळी तर्कविसंगत विधान करण्याची शक्यता असते. सावरकर बुद्धिवादी पण त्यांच्या "हिंदू"च्या व्याख्येत कितीतरी तार्किक दोष आहेत हे "सूक्ष्म-दर्शकाखाली न्याहाळून" मी दाखविले आहे. (*साभा* १०१-१०२). यामुळे सावरकरांची बुद्धिवादी दृष्टी नाकारली जात नाही. तशीच तार्किक दोष दाखविल्यामुळे श कु दंचा बुद्धिवाद अवमानित होतो असे नाही. एकमेकांचे तार्किक दोष दाखविणे ही एक वैध आणि उपयुक्त प्रक्रिया आहे. अशा चर्चेतूनच सत्यदर्शन अधिक नेमकेपणाने घडण्याची शक्यता असते.

दुसरी गोष्ट. श कु द यांची मांडणी कशी तर्कसंगत आहे हे *मी* स्पष्ट करायचे याचा अर्थ काय? मला त्यांची मांडणी तर्कसंगत वाटली नाही हे तर माझे म्हणणे आहे. ती तर्कसंगत आहे हे त्यांच्या "व्यापक विचारव्यूहाचा आलोक उभा करून" मी सांगावे ही जबाबदारी माझी कशी? आणि

ती मी उचलली नाही हा "अन्याय"? आपण शब्दांना कसे राबवतो आहोत याचे पळशीकरांना भान नाही काय?

मला श कु दंच्या एकूण लिखाणात माझ्या शंकांना उत्तरे मिळाली नाहीत. माझे वाचन अपुरे असण्याचा संभव आहे. तसे असल्यास ती त्रुटी पळशीकरांनी माझ्या नजरेस आणायला हवी होती. त्यांना जर श कु दंची मांडणी तर्कशुद्ध वाटत असेल तर तसे दाखवण्याची जबाबदारी त्यांनी घ्यायला हवी. तशी ते घेत नाहीत. उलट, त्यांनी आपल्या विचारांची मांडणी "केली असती", त्यांचा अभिप्राय असा "असावाच", अमक्याची त्यांना "खात्री असणार", शहांचा विचारव्यूह "मूलाग्राही स्वरूपात वेगळा असणार", अशी भाषा ते वापरतात म्हणजे श कु दंच्या भूमिकेमागच्या तर्कप्रणालीबद्दल त्यांना काही माहिती नाही पण ती प्रणाली काही झाले तरी योग्यच असणार याबद्दल त्यांची खात्री आहे!

श कु द तर्कशुद्ध भूमिका घेत नाहीत याच्यामागे काही कारणे असणार असे मला वाटले व त्या कारणांचा शोध घेताना मी चार प्रकारची अनुमाने केली. ती चुकीची असतील तर त्यांतल्या चुका दाखवून द्याव्या. नुसतेच "अन्याय" म्हणून आक्रोश करू नये.

श कु दंचे एखाद्या घटनेविषयीचे ज्ञान अपुरे होते असे म्हणणे व तशा म्हणण्याला पुरावा देणे, त्यांचे काही बाबतीत गैरसमज झालेले आहेत हे दाखवून देणे, त्यांचे काही मानसिक अडसर असतील अशी कल्पना करणे – या गोष्टी या व्यक्तींचा अवमान करणाऱ्या आहेत काय? जोपर्यंत टीका वैयक्तिक वळण घेत नाही आणि संयत आणि सभ्य शब्दांत ती केलेली आहे तोपर्यंत अन्यायाची भाषा काढू नये असे मला वाटते.

श कु द किंवा कुणीही टीकेपलीकडे असतात काय? तसे समजणे म्हणजे त्यांचे दैवतीकरण होत नाही काय?

गंमत अशी की, पळशीकरांनीच यांपैकी प्रत्येकावर एकेक लेख लिहून त्यांनी केलेल्या मुस्लिम प्रश्नाच्या विश्लेषणावर टीका केली होती. मग मी टीका केली तर मात्र ती दूषणास्पद होते?

### "धर्मचक्रप्रवर्तन"

माझ्या पुस्तकाच्या अखेरच्या प्रकरणातल्या अखेरच्या भागात "शेवटी पुन्हा एकदा डॉ. आंबेडकर" या शीर्षकाखाली काही मजकूर मी लिहिला आहे आणि समता व स्वातंत्र्य ही जी मूल्ये आंबेडकरांनी पुरस्कारिली त्यांचा पाठपुरावा करण्याबाबत आवाहन केले आहे. यावर पळशीकरांचे भाष्य असे : "मग बाबासाहेब आंबेडकरांना अनुसरावयाचेच असेल – कारण जाणीवपूर्वक त्यांचे नाव घेऊन पुस्तकाचा शेवट स.ह. करतात – तर, 'सामाजिक समरसता मंच'ची गोष्ट न करता, हिंदुत्वविचाराला तिलांजली देऊन, आंबेडकरांच्या अर्थाने बौद्ध होण्यासाठी धर्मचक्रप्रवर्तन करण्यासाठी प्रस्थान ठेवण्याचीच गोष्ट तर्कसंगतपणे स.हं. नी करावयास नको होती का?" (*नभा* ६९)

हे एक विनोदी विधान न समजता मी त्याचा गंभीरपणे परामर्श घेऊ इच्छितो. मी बौद्ध होणार नाही आणि धर्मचक्रपरिवर्तनही करणार नाही. मला आजपर्यंत तरी धर्माची गरज वाटलेली नाही. हिंदू धर्माचीसुद्धा. दीक्षाविधी, मुंडन, दंड, काषायवस्त्रे यांचे ज्यांना आकर्षण असेल त्यांना ते सर्व लखलाभ असो. पळशीकरांनी तसे केल्यास (किंवा केलेले असल्यास) माझी कसलीही हरकत असणार नाही. माझा तो मार्ग नव्हे. समाजधारणेसाठी कोणता तरी धर्म हवा असे मला वाटत नाही. त्यामुळे पळशीकरांच्या या तळमळीच्या आवाहनाला मला प्रतिसाद देता येत नाही याचे मला वाईट वाटते. सावरकरांनी "धर्मांतर कसले करता? 'रॅशनॅलिस्ट क्लब' काढा", असे आंबेडकरांना सुचविले होते. माझी तीच भूमिका आहे. समता, व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिवाद इत्यादी मूल्यांवर आधारलेला समाज मला पुरेसा आहे.

नामतः मी "हिंदुत्व"वादाला तिलांजली दिलीच आहे – म्हणजे "हिंदू" या संज्ञेऐवजी "भारतीय" या संज्ञेला पसंती दिली आहे. माझा राष्ट्रवाद येथल्या परंपरेकडून पोषण घेणारा भारतीय राष्ट्रवाद आहे.

समरसता मंचाची गोष्ट मी केलीच नाही; पण करायला काय हरकत आहे? म्हणजे असे की, माझ्या माहितीप्रमाणे तो समाजाच्या उपेक्षित वर्गात काही फार चांगले काम करीत आहे. त्याचा मुद्दाम गौरव करायला पुस्तकात कारण नव्हते म्हणून केला नाही. एरवी त्या कामाविषयी मला आस्था आहेच.

### हिंदू "समाज"

हे राष्ट्र घडायचे आहे, आपण ते घडविले पाहिजे, अशी माझी धारणा आहे. बहुतेक हिंदुत्ववादी हे राष्ट्र पूर्वीपासून (उदा. पाच हजार वर्षे) अस्तित्वात आहे असे म्हणतात खरे; पण तसे असते तर राष्ट्रउभारणीचे त्यांचे म्हणून जे प्रयत्न आहेत ते त्यांनी केले नसते.

अनुक्रमणिका

या माझ्या परंपराधिष्ठित भूमिकेविरुद्ध मी काही मत मांडले आहे असा पळशीकर यांचा समज झालेला आहे. "ज्या अर्थाने जगातले इतर समाज 'समाज' आहेत त्या अर्थाने हिंदुसमाज 'समाज' नाही", असे वाक्य मी माझ्या पुस्तकात लिहिले होते आणि मार्क्सने शेतकरी समाजाला दिलेली "वटाट्यांच्या पोत्या"ची उपमा हिंदुसमाजाला दिली होती. "हिंदुसमाज समाज म्हणून अस्तित्वातच नाही असे समजून विचाराला सुरुवात केली तरी चालण्यासारखे आहे", असेही मी म्हटले होते (*साभा* २३३). यावर पळशीकरांचा प्रश्न असा की, "मग गौरवास्पद इतिहास, परंपरा, संस्कृती यांच्याबद्दल आधी एवढे विवेचन कसे येते?" (*नभा* ६९) तेव्हा हे स्पष्ट करायला पाहिजे.

"हे राष्ट्र पाच हजार वर्षांपूर्वीपासून अस्तित्वात आहे", अशी समजूत उराशी धरून बसण्यापेक्षा ते मुळातच समाज म्हणूनही अस्तित्वात नाही असे दुसरे टोक हाताशी धरून विचार करणे जास्त फलप्रद ठरेल असा माझ्या वाक्याचा अर्थ आहे. टोकालाच जायचे ना, तर मग दुसऱ्या टोकाला जा, ते जास्त उपयुक्त होईल – असा माझ्या म्हणण्याचा अर्थ. म्हणजे हे वाक्य काहीसे आवेगाने लिहिले आहे. मीच अगोदर वर्णन केलेल्या हिंदुसमाजाच्या दुःखद चित्राशी ते नाते सांगणारे आहे. थोडक्यात, पळशीकरांनी ते वाक्य परमार्थाने घेऊ नये.

मात्र माझे मत असे आहे की, हिंदुसमाजाची जशी एक विस्कळित, छिन्नभिन्न बाजू आहे तशीच एक काहीशी क्षीण पण सांधणारी बाजू आहे. जगातला कुठलाही समाज शंभर टक्के 'समाज' नसतो, म्हणजेच पूर्णपणे एकात्म नसतो, तसेच हे आहे; मात्र हिंदू समाज विस्कळीतपणाकडे अधिक कललेला आहे. किंवा असे म्हणू या की, माझे जे काही विविध समाजांचे, अर्थातच तुटपुंजे, ज्ञान आहे त्यावरून मला असे दिसते की हिंदुसमाज (किंवा, "हिंदू" नाव असलेला लोकसमूह) हा या बाबतीत सर्वात कनिष्ठ पातळीवरचा मानावा लागेल. तरीही जिच्या आधारावर नवी बांधणी करता येईल अशी काही सामग्री सुदैवाने आपल्याजवळ आहे. ती पारखून घेऊन पुनरुज्जीवित केली पाहिजे आणि ऐकात्म्याची नवी सूत्रे तीत समाविष्ट केली पाहिजेत. आणि असे करण्याला पर्याय नाही हेही खरे आहे. हे आव्हान केवढे मोठे आहे हे निदर्शनास आणून देण्यासाठीच जरा वक्तृत्वपूर्ण भाषा वापरली.

माझ्या उपर्युक्त वाक्यांना पळशीकरांनी "विलक्षण" म्हटले आहे आणि ती लिहिताना मी "सैरभैर" झाल्याचे सांगितले आहे (*नभा* ६९) पण त्यांनीही एक विलक्षण वाक्य लिहिले आहे. मी केलेले वर्णन "एका नादान, अंधश्रद्ध, अनाचारी लोकांचे वर्णन आहे", असे ते म्हणतात. (तत्रैव) जी प्रत्येक बाबतीतली दोन टोकांची अवस्था मी सांगितली आहे त्यातली काही टोके चांगलीही आहेत. पण तोही मुद्दा बाजूला ठेवू. कुठल्याही समाजाला, मी तरी "नादान" कदापी ठरवणार नाही. असे म्हणणे म्हणजे समाजशास्त्रीय दृष्टीचा अभाव व्यक्त करणेच आहे. दुसरे असे की, अशी भाषा वापरणे हे समाजसुधारणेबाबत, राष्ट्रवादाच्या उभारणीबाबत, असहायता आणि निराशा प्रकट करण्यासारखे आहे आणि तशी निराशा माझ्या मनात नाही. तिसरे असे की, असा आपल्या समाजाचा अपमान करून ज्या कुणालाही समाजासाठी जे काही थोडेफार करावेसे वाटते त्याला ते करताच येणार नाही.

या समाजात काहीही गौरवास्पद, अभिमानास्पद नाही असे पळशीकरांचे मत बहुधा नसावे. त्यामुळे त्याची यादी देण्याचा उद्योग मी करीत नाही. तेव्हा या देशाला एकत्र जोडणाऱ्या काही परंपरा आहेत, त्यातल्या काही अभिमानास्पदही आहेत या मुद्याबाबत त्यांचे आणि माझे एकमत आहे असे तूर्त तरी मी धरून चालतो.

सारांश असा की, हिंदुसमाज आणि भारतीय समाजही कितीही विस्कळीत किंवा शतभिन्न असला तरी जे आजही उपयोगाला आणता येईल असे थोडेफार संचित त्याच्याजवळ आहे असे माझे मत आहे.

## (३) समारोप

### सारांश

वसंत पळशीकर यांच्या जवळजवळ प्रत्येक आक्षेपाला मी उत्तर दिले आहे. आता सारांशरूपाने माझे म्हणणे काय आहे व पळशीकरांच्या लेखाचे स्वरूप मला कसे दिसते हे सांगतो.

(अ) आंबेडकर व श कु द यांचा केवळ आधार मी घेतल्यामुळे माझ्या मनात काही दुष्ट योजना असावी असे पळशीकर सूचित करतात पण ती नेमकी काय हे सांगत नाहीत.

(आ) मुस्लिम प्रश्नाच्या विवेचनाला माझ्या पुस्तकाचा बेप्रमाण भाग वाहिल्यामुळे ते विवेचन "आक्रमक" इत्यादी होते ही कार्य-कारण मीमांसा तर्कदुष्ट आहे.





(इ) श कु द यांचे म्हणणेच मुळात आक्रमक आहे असा पळशीकरांचा दावा टिकणारा नाही. सत्यस्थितीचे श कु दनी किंवा मी केलेले वर्णन म्हणजेच आक्रमकता हेही म्हणणे तर्कदुष्ट आहे.

(ई) मुस्लिम प्रश्नाचे चित्रण खोटे किंवा अतिरंजित आहे असे दाखविण्याचा कसलाही प्रयत्न पळशीकर करीत नाहीत. इस्लाम हे मुस्लिम प्रश्नाचे मूळकारण किंवा एक महत्त्वाचे कारण आहे की नाही हा मूळ मुद्दा आहे, त्याबद्दल पळशीकर अवाक्षरही काढीत नाहीत.

(उ) संघटनाचे आवाहन म्हणजे आक्रमणाचे आवाहन असा चुकीचा अर्थ ते करतात.

(ऊ) माझ्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीनंतर मी "हिंदू" ऐवजी "भारतीय" शब्द योजावा अशी शिफारस करीत आहे आणि "संघटन" शब्दामागची माझी विवक्षा अनाक्रमक आहे हे पुनःपुन्हा ध्यानात आणून दिल्यावरही पळशीकर "हिंदू" आणि "हिंदुसंघटन" हे शब्द पुनःपुन्हा माझ्या डोळ्यांसमोर नाचवून काय साधीत आहेत हे कळत नाही.

(ए) मुसलमानांचा प्रश्न भयावह असला तरी त्यांना राष्ट्रीय जीवनात सामावून घेतले पाहिजे हे माझे स्पष्ट मत असूनही आणि ते उद्दिष्ट कसे गाठावे याची योजना मी सुचविलेली असूनही पळशीकर मला आक्रमक ठरवतात. यात त्यांचा तसा हट्टच आहे याखेरीज दुसरे काही दिसून येत नाही.

(ऐ) अराष्ट्रीय शक्तींना काबूत ठेवण्यासाठी धर्मनिरपेक्षतेच्या तत्त्वाचा मान राखूनच काही व्यावहारिक योजना सुचवली तर पळशीकर तिला आक्रमक ठरवतात.

(ओ) हिंदुत्ववाद्यांत कुणीच आक्रमक नाहीत का? असे पळशीकर विचारतात पण ते कोण हे सांगत नाहीत.

(औ) सावरकर व संघ यांच्या विचारात "उदारता" दिसून आली तर तो राजकारणी डाव आहे किंवा धूर्त चाल आहे असे म्हणताना पुरावा देण्याची त्यांना गरज वाटत नाही किंवा विरुद्ध बाजूचा पुरावा खोडण्याचा प्रयत्न ते करीत नाहीत.

(अं) माझे विवेचन पटत नसेल तर ते "चूक" आहे असे म्हणण्याऐवजी मी सावरकरांची व संघाची "वकिली" करीत आहे असे म्हणणे पळशीकरांना शोभून दिसत नाही असे मला वाटते.

(अः) संघपरिवार "एकतर्फी" धर्मनिरपेक्षता लादू पाहत आहे या विधानाला त्यांनी पुरावा दिलेला नाही. जी काही कारणमीमांसा त्यांनी केली आहे ती त्यांच्या स्वतःच्या धर्मनिरपेक्षतेविषयी शंका उत्पन्न करणारी आहे.

(क) आंबेडकर व श कु द यांचा मी गैरवापर केला आहे पळशीकर सुचवतात. पुरावा नाही.

(ख) मी धर्मचक्रप्रवर्तन करावे, श कु द ची मांडणी तर्कशुद्ध आहे असे मी सिद्ध करावे या सूचनांना हास्यास्पदच म्हटले पाहिजे. शहांची मांडणी तर्कशुद्ध आहे हे खरे म्हणजे त्यांचे या बाबतीतले समर्थक स्वतः पळशीकर यांनी सिद्ध करायला हवे.

थोडक्यात, पळशीकरांच्या लेखात मुख्यतः शेरे आहेत, आरोप आहेत, ठाम विधाने आहेत पण कुठल्याही विधानाला पुरावा दिलेला नाही. शिवाय तर्कदोष आणि विसंगती आहेतच. म्हणजे हा लेख सुदीर्घ असूनही पोकळ आहे; कारण त्यात काही महत्त्वाचा, लक्षात घ्यावा असा युक्तिवाद केल्याचे दिसत नाही. असे का व्हावे?

पळशीकरांसारख्या लेखकाकडून असे का व्हावे?

याची मीमांसा मी पुढीलप्रमाणे करतो. मुळात त्यांचा एक दाट पूर्वग्रह आहे आणि तो हिंदुत्ववादी संस्थांबद्दल आहे, आज संघपरिवाराबद्दल आहे.

म्हणून हिंदुत्ववादी मंडळी मुसलमानांचा जो प्रश्न उपस्थित करतात तो खोटाच असला पाहिजे असे त्यांचे मत झालेले आहे. इतके की, त्याचे विवरण हेच आक्रमण असे समीकरण त्यांच्या मनात तयार झालेले आहे. मी संघाबद्दल एखादा बरा शब्द बोललो तरी त्यांना खपत नाही. "समरसता मंचा"चा अगदी आनुषंगिकपणे आलेला उल्लेखही त्यांच्या डोळ्यात खुपतो.

**संघद्वेष**

पळशीकरांची संघाविषयीची अरुची इतकी पराकोटीची आहे की ती ओसंडून वाहून माझ्यापर्यंत येते. सावरकर किंवा संघ यांच्या "उदार" भूमिका त्यांच्या दृष्टीने चलाखीच्या, धूर्तपणाच्या, "औपचारिक" असतात. तशाच माझ्याही! (*नभा* ६८) हिंदुत्वाच्या दोन महत्त्वाच्या विचारधारांचा विस्तृत परामर्श घेऊन माझी स्वतःची राष्ट्रवादाची संकल्पना मांडण्यासाठी मी शेवटचे "विधायक राष्ट्रवादाच्या दिशेने" हे प्रकरण लिहिले.

आधीच्या चर्चेच्या पार्श्वभूमीवर माझी स्वतंत्र मांडणी मी येथे केली असल्यामुळे मागच्या विवेचनातून निष्पन्न झालेला निष्कर्षच मी येथे मांडला आहे. "रचने"मुळे त्याला वाहिलेली पाने पुरेशी नाहीत असा पळशीकरांचा आक्षेप असेल तर मी समजू शकतो. पण माझी भूमिका जी आहे ती मी त्याच प्रकरणात मांडलेली आहे; तत्पूर्वीचे बह्वंश पुस्तक टीकात्मक आहे. इतके असूनही पळशीकर विधायक भागावर लक्ष द्यायला तयार नाहीत. ते लिहितात : " 'विधायक राष्ट्रवादाच्या दिशेने' ही पुस्ती... केवळ एक काळ्या ढगाला रुपेरी कडा देवविण्याचा प्रकार ठरतो." (*नभा* ७१-७२) अशा रीतीने माझ्या मुख्य प्रतिपादनाची वाट लावून ते आपल्या लेखाचा शेवट करतात. सारांश, मी जे काही या प्रकरणात म्हणतो ते "खरे नाही" असे सुचवतात. त्यांचा-माझा जुना स्नेहसंबंध नसता तर कदाचित माझ्या भूमिकेला ते "पोलादी पंजावर चढवलेला रेशमी हातमोजा" म्हणाले असते.

### मी कोण?

लेखाच्या अखेरी-अखेरीस, विशेषतः ६ व्या भागात, पळशीकरांनी माझे जे वर्णन केले आहे त्यामागची सद्भावना लक्षात घेऊनही त्यामुळे मी गोंधळून गेलो आहे हे मला कबूल करणे भाग आहे. या ठिकाणी प्रारंभी त्यांचा सूर गौरवयुक्त आहे. सावरकर व संघ यांच्याहून मी "निर्णायकपणे" वेगळा आहे; माझा हिंदुत्ववाद "लिबरल" जातकुळीचा आहे (*नभा* ६९). अर्थात लिबरलांतही माझी उप-जातकुळी कोणती याबद्दल त्यांचा अनिश्चय आहे. मी "परंपरानिष्ठ" लिबरल आहे असे त्यांनी एका ठिकाणी म्हटले आहे आणि अशा लिबरलाचे उदाहरण म्हणून त्यांनी न्या. रानड्यांचे नाव घेतले आहे. (*नभा* ७१, पदटीप) पण त्याअगोदर त्यांनी माझे 'खरे पूर्वसूरी' लो. टिळक आहेत असे म्हटले होते (*नभा* ६४). हमीद दलवाई, अ.भि. शहा यांची जी जातकुळी ती "वास्तविक" माझी असे त्यांनी अन्य एका ठिकाणी म्हटले आहे (*नभा* ७०) आणि शहा तर त्यांच्या मते रानड्यांच्या तुलनेने "आधुनिकतावादी" लिबरल होते. असा प्रत्येक प्रकारचा लिबरल मी असूनही शिवाय "आक्रमक" आहे तो आहेच! किंबहुना दुसऱ्या आवृत्तीत जास्तच आक्रमक झालो आहे. अशा रीतीने एखाद्या वैफल्यवादी आधुनिक कादंबरीच्या नायकाप्रमाणे माझी "आयडेंटिटी" पार "हरवून" गेल्याचा अनुभव काही काळ तरी पळशीकरांचा लेख वाचताना मला आला.

पण त्यांना जे काय व्यक्त करायचे आहे ते पुढच्या वाक्यात प्रकट झाले असावे असे मी समजतो. "... परंपरानिष्ठ पण लिबरल असलेले स.ह. परंपरेचे गौरवीकरण करणाऱ्या मूलतत्त्ववादी कट्टर संघ-परिवाराची कड घेण्याची गोष्ट करतात आणि जातीयवादी हिंदुत्ववादाची तळी उचलून धरतात, असे चित्र समोर येते." (*नभा* ७१)

याचा मी असा अर्थ करतो की, माझी मुळातली जातकुळी "लिबरल" (मला कुणी विचारलेच तर त्यातल्या त्यात "शहांच्या जवळची" असे मी सांगेन. पण असली वर्णने कधी नेमकी नसतात, अति सुलभीकरण करणारी असतात आणि मला ती आवडत नाहीत.) तरीसुद्धा कोणत्या तरी कारणाने मी आक्रमक संघाची कड घेतो.

पळशीकर मला आक्रमक वगैरे म्हणतात ते सगळे चुकीचे कसे आहे ते वर सांगून झालेच आहे. आता प्रश्न इतकाच उरतो की, मी संघाची कड घ्यायला कोणते कारण असावे?

'ए गुड मॅन फॉलन अमंग दि फेबियन्स' असे लेनिन शॉ यांच्याविषयी म्हणाले होते. किंवा वाजपेयी 'राइट मॅन इन दि राँग पार्टी' असे म्हणण्याची चाल आहे. लेनिन ह्यांची शॉ यांच्या वर्तनाविषयीची काय कारणमीमांसा होती याची मला कल्पना नाही. पण वाजपेयींना चुकीच्या पक्षात राहूनही निदान पंतप्रधान होण्याचे प्रलोभन तरी आहे, अशी कारणमीमांसा त्यांच्या आक्षेपकांच्या मनात असणार.

या दिशेने, म्हणजे एखाद्या भौतिक लाभाच्या दिशेने पळशीकर अर्थातच शोध घेणार नाहीत. त्यांच्या सौजन्याशी ते सुसंगत नाही. म्हणून माझा मीच शोध घेतला. आणि मग विचार करताना मला असे दिसून आले की, संघाशी जवळीक साधल्याने माझा काही लाभ होण्याची शक्यता नव्हती, झालेलाही नाही. किंबहुना म्हटलेच तर हानी भरपूर झालेली आहे. लोकप्रिय आणि फॅशनेबल (पण माझ्या मते उथळ आणि विघातक) अशा विचारसरणींचा पाठपुरावा मी केला असता तर 'भवितव्यानां द्वाराणि भवन्ति सर्वत्र' अशी माझी स्थिती झाली असती. (व्यक्तिशः पळशीकरांवर ही छद्मी टीका नाही. या बाबतीत मी त्यांना पुरेसा ओळखतो.)

आणि संघाला मी खूप जवळ करीन. पण संघाने मला केले पाहिजे ना? मी "संघाचा विचारवंत" नाही. आणि संघ तसे मला म्हणत नाही हे संघाच्या दृष्टीने बरोबरच आहे,


अनुक्रमणिका

कारण त्याची मते मी मांडत नाही. माझ्यासारख्या नास्तिक आणि धर्मलंड माणसाचे संघात स्वागत होणार ते वेतावातानेच. "पुरोगामीपणाची हौस असलेला एक जुन्या काळचा संघस्वयं-सेवक" असे माझे वर्णन संघातले काही लोक तरी करतात. असे माझ्या निदर्शनास आले आहे. शिवाय पळशीकरांप्रमाणेच इतर अनेकांनी मला संघवाला ठरवलेला असल्यामुळे पुरोगामी वर्तुळातही माझे लेखन न छापण्यापासून प्रत्यक्ष अपमानकारक वागणूक देण्यापर्यंत अनेक प्रकार घडलेले आहेत. तेव्हा कसलेही आमिष माझ्यापुढे नव्हते आणि नाही. आत्मनिवेदनात फार न जाता थोडक्यात इतकेच म्हणतो की, शक्य तेवढी वस्तुनिष्ठा बाळगून अभ्यास करण्याचा मी प्रयत्न करीत आहे.

**मुस्लिम प्रश्नाविषयी आणखी थोडे**

पळशीकरांनी हिंदू-मुस्लिम संबंधांविषयी आपले स्वतंत्र व समग्र निवेदन केव्हा तरी सादर करावे.

इथल्या राष्ट्रवादापुढचा एक, आणि माझ्या मते एकमात्र नसला तरी सर्वात महत्त्वाचा प्रश्न म्हणजे हिंदू व मुसलमान यांच्या परस्परसंबंधांचा प्रश्न. त्याला मी वहुधा 'मुस्लिम प्रश्न' असे म्हणतो. संक्षेपच करायचा तर त्याला 'हिंदू प्रश्न' असे म्हणून योग्य तो संदेश वाचकाच्या मनावर उमटणार नाही. पण मी ही शब्दसंहती वापरतो त्याचा दुसराही एक अर्थ आहे. येथला हिंदू-मुसलमान प्रश्न प्राधान्याने आणि मुळात मुसलमानांनी निर्माण केलेला किंवा त्यांच्यामुळे निर्माण झालेला प्रश्न आहे असे माझे मत आहे.

या विषयाच्या संदर्भात मी जे अगोदर माझ्या पुस्तकाच्या पहिल्या व दुसऱ्या आवृत्तीत म्हटले आहे त्यात मुद्याची भर पडेल असे माझ्याजवळ आता फारसे नाही.

मात्र काही पूरक मजकूर त्यांच्यापुढे ठेवण्याची परवानगी घेतो.

मुस्लिम प्रश्न केवळ भारतातच अस्तित्वात नाही; जगात जिथे-जिथे अल्पसंख्य पण नगण्य नाहीत इतके मुसलमान आहेत त्या जवळजवळ प्रत्येक देशात हा प्रश्न विद्यमान आहे याकडे पळशीकरांनी विशेषत्वाने ध्यान द्यावे. अमेरिका, इंग्लंड, रशिया, चीन, जर्मनी इत्यादी विकसित देशांतूनही हा प्रश्न कमीजास्त तीव्र स्वरूपात उद्भवतो याचा अर्थ आर्थिक मीमांसा, (परकीय राज्य-निर्मित) भेदनीतिमूलक मीमांसा, हिंदूंच्या (किंवा हिंदू वरिष्ठ वर्णांच्या म्हणा) तथाकथित "म्लेंच्छ" भावनेवर आधारित मीमांसा – अशा या प्रश्नाच्या सगळ्या मीमांसा एकदम लंगड्या पडतात आणि मुस्लिम मनोवृत्ती आणि वर्तन यांची मुख्य कारणे या मीमांसांबाहेर शोधावी लागतात. ती इस्लाम धर्म, मुसलमानांचा जेतृत्वाचा अभिमान, हिंदूंचा फुटकळपणा आणि मुसलमानांची मुजोरी या कारणांत सापडतात. सावरकर, आंबेडकर, शहा, कुरुंदकर, दलवाई हे सर्वजण जे म्हणत होते ते त्या-त्या वेळी या काहीशा नव्या आणि दुर्दैवी पुराव्याअभावीही खरेच होते. पण या जागतिक पुराव्याने त्यांनी केलेली मीमांसा आता अधिक बळकट होते.

इस्लाम धर्मावर आधारित मीमांसा ही पहिल्या क्रमांकाची मीमांसा असे धरून चालणारी आणि तसे धरून न चालताही तिला एक महत्त्वाची मीमांसा मानणारी मंडळी हिंदुत्ववादाच्या परिघाबाहेरही सापडतील. त्यांची संख्या आता बरीच वाढली आहे. माझ्याच परिचयाची अशी पंधरावीस माणसे आहेत. हे दृश्य नवीन आहे आणि विचार करायला लावणारे आहे.

यासारखीच पण याहून अधिक महत्त्वाची घटना म्हणजे मुस्लिम मूलतत्त्ववादाला काही मुसलमान विचारवंतांचीच तीव्र प्रतिक्रिया आता होत आहे. सलमान रश्दी, तसलिमा नसरीन यांच्या मागोमाग आता अन्वर शेख, नसरत हुसेन खान, इब्न वराक यांची नावे उदयाला आली आहेत. नसरत हुसेन खान म्हणत आहेत की, हिंदुस्थान-पाकिस्तान या देशांमधल्या जनतेची मुळे एकच आहेत व फाळणीची चूक आता दुरुस्त करावी (*Rediscovery of India*). अन्वर शेख हे कार्डिफ इथे राहून मृत्युदंडाच्या फतव्याला न जुमानता *लिवर्टी* नावाचे नियतकालिक चालवीत आहेत, *इस्लाम : दि अरव नॅशनल मूव्हमेंट* या पुस्तकात त्यांनी इस्लाम धर्म हा अरव राष्ट्रवादाचा आविष्कार आहे, तो रूढार्थाने 'धर्म' नाही असे मत मांडले आहे; *इटर्निटी* या ग्रंथात ते सेमिटिक धर्मांवर टीका करून 'वैदिक' दृष्टिकोनाकडे वळत आहेत. इब्न वराक या मूळ 'एका धार्मिक मुस्लिम देशात' जन्मलेल्या गृहस्थांनी इस्लाम हे जगावरील अरिष्ट ठरविले आहे; मात्र असे करताना त्यांनी इतका विद्वत्तापूर्ण, सप्रमाण आणि सयुक्तिक ग्रंथ लिहिला आहे की, अनेक इतिहासपंडितांनी त्याला मान डोलावली आहे. नसरत हुसेन खान यांचे पुस्तक मी पाहिलेले नाही, पण त्याचा सारांश मला मिळालेला आहे. अन्वर शेख यांची पुस्तके मी वाचली आहेत. इब्न वराक यांचे पुस्तक व त्यावरील पाश्चात्त्य नियतकालिकांत आलेले सहा अभिप्राय मला वाचायला

मिळाले आहेत. ही माहिती अशासाठी दिली की, याही घटना इस्लामबद्दल बरेच काही सुचवतात. (पाहा माझा अभिप्राय-लेख, 'संघपरिवार आणि मुस्लिम प्रश्न', *महाराष्ट्र टाइम्स*, १२-१२-९७)

**अभ्यासकाचे व्रत**

पळशीकरांची दृष्टी एका तटस्थ अभ्यासकाची नाही हा मला एक धक्का देणारा अनुभव ठरला. संघपरिवाराला 'अस्पृश्य' ठरवण्याच्या राजकीय लाटेला त्यांच्यासारखा एरवी समतोलपणे विचार करणारा लेखक बळी पडलेला आहे. तो परिवार एक राक्षस आहे, एक विषारी भुजंग आहे असा त्यांच्या मनाचा निश्चय आहे. संघ हा त्यांना एक अभेद्य शिलाखंड वाटतो, की ज्याच्यावर डोके आपटून फक्त रक्त येईल; म्हणून त्याच्याशी बोलूसुद्धा नये – ही वृत्ती मला चुकीची एवढेच नव्हे तर धोक्याची वाटते.

कारण असे पाहा की, एखादी व्यक्ती किंवा संस्था आपल्या दृष्टीने महापातकी असली तर तिचा त्या पातकांतून उद्धार करणे हे आपले नागरिक म्हणून कर्तव्य असते. आपण असे क्षणभर समजू या की, पळशीकरांनी या लेखात व्यक्त केलेल्या व व्यक्त न केलेल्या पापांचाही संघ धनी आहे; मग देशहितासाठी आपण त्याला चार शब्दही सांगू नयेत? उलट, त्याला अस्पर्श ठरविल्यामुळे तो त्या पापांत अधिक रुतत जाणार नाही का?

अशी झापडे आकलनाच्या मार्गातही येतात. ज्या शत्रूशी आपल्याला मुकाबला करायचा आहे तो समजून घेणे गरजेचे असते हे तरी पळशीकरांनी लक्षात ठेवावे.

हे मी म्हणतो याचे आणखी एक कारण आहे. ही राजकीय अस्पृश्यतेची लाट ज्या विचारवंतांपर्यंत पोचलेली आहे त्यांत केवळ वसंत पळशीकर नाहीत. इतरही अनेक आहेत.

आपण पुन्हा एकदा असे समजू या की, संघपरिवार ही एक दुष्ट आणि हिंस्र शक्ती आहे. मग तिचा बंदोबस्त केला पाहिजे. तो कसा करणार? लोकशाहीत – जी मला व पळशीकरांना सारखीच प्रिय आहे – संवाद, प्रबोधन हाच एकमात्र पर्याय उपलब्ध आहे. या ठिकाणी असाही विचार मनात येतो की, पळशीकरांना संघ एकुणात अपरिवर्तनीय वाटत असला तरी त्यातला प्रत्येक माणूस तसा आहे असे त्यांचे म्हणणे नसावे. अशा माणसांना संघापासून 'फोडणे' ही त्यांच्या दृष्टीनेही व्यूहरचना म्हणून जास्त उपयुक्त नाही का?

तटस्थ दृष्टीने पाहिले तर समाजाच्या अभ्यासकाच्या दृष्टीने संघ हे एक विलक्षण कुतूहल निर्माण करणारे घटित आहे असे लक्षात येईल. याचा अभ्यास अनेक पाश्चात्त्य लेखक आज करीत आहेत पण आपले बुद्धिमंत आणि समाजशास्त्रज्ञ आपल्या राजकीय पातळीवरच्या क्षुण्ण मार्गानेच चालले आहेत. कुतूहलजनक गोष्टी मला दिसतात त्या अशा:

हिंदुमहासभेची वाताहत झाली पण संघ सत्तर वर्षे टिकून आहे आणि वेगळ्या स्वरूपात वाढलेला आहे.

त्याच्या 'फॅसिझम' मध्ये एक भालचंद्र नेमाडे ज्याला 'देशीपणा' म्हणतील तो आहे. (संघामध्ये एक, म्हटले तर गंमतीदार, रूढी आहे. संघातला वक्ता प्रथम "परमपूज्य भगवा ध्वज" श्रोता आहे असे समजून त्याला आवाहन करतो. याचा काही स्वयंसेवकांच्या मनात तरी अर्थ उतरेल की "देश" सरसंघचालकांपेक्षा मोठा आहे.)

एका बाजूने हिंसेचे पाप संघाच्या माथी बसलेले आहे पण दुसऱ्या बाजूने आजही मानधन नसणारे आणि वारावर जेवणारे (किंवा न जेवणारे) हजारो प्रचारक यतिधर्म पाळीत आहेत.

पुरोगामी आणि प्रतिगामी प्रेरणांचे एक चमत्कारिक मिश्रण संघात आहे.

संघाची जी काय आक्रमकता होती ती कालाच्या ओघात वाढली नसून कमी झाल्याचा प्रत्यय येतो आहे. अध्यात्म, विश्वकुटुंबवाद, सर्वभूतहितरती, सहिष्णुता यांचे आकर्षण वाढले आहे. संघाच्या तरुणांच्या दैनिक शाखा हे आजचे वास्तव उरलेले नसून अत्यंत विस्कळीत आणि निरनिराळ्या भाषेत बोलणाऱ्या संस्थांचा एक समूह असे स्वरूप त्याला आलेले आहे. आणि आता "सेवाकार्य" हे महत्त्वाचे कार्य बनून संघाचे स्वयंसेवक रक्तदान, रक्तपेढ्या, इस्पितळे इत्यादी कार्यक्रम करीत असल्यामुळे जुन्या पिढीची मंडळी नाराज आहेत. "आक्रमकते"चा वारसा संघाच्या परिघावरून फुटून निघालेल्या किंवा स्वतंत्र संस्थांकडे गेला आहे.

संघाच्या "टिकाऊ"पणाची दोन स्पष्टीकरणे मला विचाराला उद्युक्त करतात. एक, द.न. गोखले यांच्या "समन्वयवाद", "सदृशीकरण" या संकल्पना – ज्यांचा उल्लेख मागे आला आहे. हा एक प्रकारचा "देशीपणा"च आहे. दुसरा विचार प्रा.




नी.वि. सोवनी यांचा. त्यांनी एका लेखात असे म्हटले होते की, संघ हा 'कुटुंब-तत्त्वा'चा (Family principle) एक आविष्कार आहे. हाही देशीपणाच आहे. अशा समाजशास्त्रीय मर्मदृष्टी अभ्यासाच्या दृष्टीने उपकारक ठरतील.

अशी यादी वाढवता येईल. शेवटी फक्त एक गोष्ट सांगतो. सुशिक्षित, बुद्धिमान, प्रारंभी बहुधा ब्राह्मण अशा तरुणांची ही संघटना बराच काळ विचार, अभ्यास यांची शत्रू बनली. मात्र या अवस्थेतून आज ती काहीशी बाहेर येत आहे याची पुसट चिन्हे दिसू लागली आहेत.

पण या बाबतीत एक मुद्दा पळशीकरांनी विशेष लक्षात ठेवायला हवा. संघाच्या भूमिकेचा विचार करताना ती काही तत्त्वचिंतकांनी मांडली आहे असे समजू नये. तसे तत्त्वचिंतक संघात नाहीत. संघाचे म्हणून आपण जे तत्त्वज्ञान समजतो त्याची मांडणीच झालेली नाही. आहे ते घोषणांच्या (स्लोगन्स) स्वरूपाचे आहे. कारण संघात अभ्यासाची परंपरा नाही. त्यामुळे विचारांच्या बाबतीत अराजक आहे. म्हणून एकूण – राष्ट्रवादाच्या संदर्भात – संघाची वाटचाल दिशाहीन आहे ('तात्त्विक अराजक', *साभा* १९७). संघाचे म्हणून जे म्हणणे आहे त्याची चर्चा करताना हा मुद्दा लक्षात ठेवायला हवा.

### विनंती

पळशीकरांनी एक गोष्ट करणे शक्य आहे. मी जो राष्ट्रवाद मांडतो आहे त्यात संघाची 'कड' घेतो असे त्यांना ज्या-ज्या ठिकाणी वाटते तो भाग माझ्या लेखनात नाहीच असे त्यांनी समजावे. यात एक मानसिक प्रयास आहे पण तो शक्य कोटीतला आहे. माझा त्यांना वाटणारा संघाला पाठिंबा वगळून जो राहील तो माझा राष्ट्रवाद. त्याचे मूलाधार या लेखात प्रारंभी मी सांगितलेच आहेत. त्यांच्याकडे निर्मळ दृष्टीने पाहून त्यांचे मूल्य त्यांनी स्वतंत्र रीतीने जोखावे.

असे त्यांना पाहता येईल असा दिलासा देणारी दोन विधाने त्यांच्या लेखात आली आहेत. पण ती इतकी निसटती आणि गौणपणाने आली आहेत की, त्यांचाच शब्द वापरायचा तर, ती "औपचारिक" झाली आहेत. ती विधाने किंवा विधानांश असे :

१. 'मुस्लिम प्रश्नाच्या वाढत्या उग्र व बेबंद स्वरूपामुळे' (स.ह. परत सावरकरांकडे व संघाकडे वळले.) (*नभा* ६९)

२. "... भारतीय राष्ट्रवादाची मुळे हिंदू संस्कृती, इतिहास व परंपरा यांत रुजलेली असायला हवीत असे आज म्हणता येणार नाही. वैदिक-अवैदिकांच्याही पलीकडे व त्यांच्याही आधीपासून येथे अनेक लोकसंस्कृती नांदत आल्या, आणि त्या अद्यापीही मृत झालेल्या नाहीत. तेथपासून ते थेट ब्रिटिश वासाहतिक कालखंडात ब्रिटिशांनी येथल्या प्रवाहात आणून सोडलेला त्यांचा एक आधुनिक पाश्चात्त्य प्रवाह येथपर्यंत सर्वांच्या समावेशामधून आमचे भलेबुरे, सुंदर-कुरूप, भारतीयत्व सिद्ध झालेले आहे. ज्याला आपण 'हिंदू' असे, काहीसे सर्वसमावेशक 'होल्ड-ऑल' वृत्तीने, म्हणू शकू तो प्रवाह येथील मुख्य प्रवाह आहे, असे विधान अर्थपूर्ण होईल. पण त्यात जे अन्य प्रवाह गेल्या हजार-बाराशे वर्षांमध्ये येऊन मिळाले त्यानंतर त्याचे स्वरूप प्रयागच्या पुढील गंगेच्या प्रवाहासारखे आहे. प्रयागपुढील नदीला आपण गंगाच म्हणतो. पण यमुना व नंतर येऊन मिळणाऱ्या अन्य नद्यांना वेगळे न करण्याच्या बोलीवरच तसे म्हणता येते." (*नभा* ७०-७१)

पहिले विधान मला मान्य आहे.

दुसरेही त्याचा आशय लक्षात घेता मला मान्य आहे. पण त्याची भाषा मला नापसंत आहे. पळशीकरांना कदाचित हे माहीत नसेल की, मिश्र संस्कृतीचा विषय काढला की, हिंदुत्ववादी नेमके हेच उत्तर देतात. ते म्हणतात की, गंगौघ हिंदू संस्कृतीचा आहे; इतर प्रवाह येऊन मिळाले तरी गंगेला गंगाच म्हणतात; म्हणून येथल्या संस्कृतीला हिंदू संस्कृतीच म्हटले पाहिजे. म्हणजे पळशीकरांची येथली परिभाषा हिंदुत्ववादी नसली तरी हिंदुवादी आहे. माझी दुरुस्ती एवढीच की, आपण आता 'हिंदू' शब्द टाळूया आणि 'भारतीय' संस्कृती म्हणूया.

आपले हे विचार गौणत्वाने न आणता पळशीकरांनी केंद्रस्थानी ठेवले तर त्यांना असे दिसून येईल की, एकमताचे क्षेत्र मोठे आहे.

मग प्रश्न राहतील ते असे. संस्कृतीचे ऐहिक आविष्कार धार्मिक आविष्कारांपासून कसे बाजूला काढायचे? जी भारतीय संस्कृती म्हणून नागरिकांच्या मनावर बिंबवू पाहणार तिच्यात लोकसंस्कृती, श्रेष्ठीसंस्कृती, प्रादेशिक संस्कृती, धर्मसंबद्ध संस्कृती इत्यादींचे स्थान काय राहील? जी तात्त्विक मांडणी आपण करू तिचे उपयोजन कशा पद्धतीने, कोणत्या माध्यमांतून







अनुक्रमणिका

करणार? जागतिक संस्कृती आणि राष्ट्रीय संस्कृती यांची सांधेजोड कशी करणार?

माझ्या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत मी म्हटले होते. "माझे विवेचन हिंदुत्ववादी आणि त्यांचे टीकाकार ह्या दोघांनाही पूर्णपणे पटेल असे नाही. पण सांस्कृतिक राष्ट्रवादाच्या संकल्पनेतून काही महत्त्वाचे प्रश्न निर्माण होतात व त्यांची गंभीरपणाने दखल घेतली पाहिजे एवढे जरी त्यांच्या मनावर बिंबले तरी ह्या पुस्तकाचा कार्यभाग साधला असे म्हणता येईल. माझ्या प्रतिपादनाबद्दल मी आग्रही नाही. मला आणखी प्रकाश मिळाला तर हवाच आहे. चर्चेतून व विचारमंथनातून तो प्राप्त होईल अशी आशा आहे." (*साभा* पाच)

मी जो शोध करीत आहे त्यात पळशीकरांनी सहभागी व्हावे. म्हणजे त्यांनी एक पत्रात म्हटल्याप्रमाणे "विषय पुढे सरकेल."











अनुक्रमणिका

वाद-संवाद

# नियती म्हणजे काय?

**देवीदास बागूल**

नियती हा शब्द आध्यात्मिक आहे. भौतिक नाही. शारीरिक नाही.

भौतिक घडामोडींना परिणाम म्हणतात. लाकडावर लाकूड जोराने घासले तर अग्नी निर्माण होतो. अग्नी निर्माण होणे हा परिणाम झाला, नियती नव्हे. दमट हवेमुळे शरीराला घाम आला तर घाम हा परिणाम झाला, नियती नव्हे.

जन्माला आलेला प्रत्येक माणूस मृत्यू पावतो. मृत्यू हा परिणाम नव्हे. नियती तर नाहीच. मग मृत्यूला काय म्हणणार? जन्माचे दुसरे टोक. जन्माची परिणती. जन्म आणि मृत्यू ह्या दोन्ही घटना एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. जन्म झाल्यावरोबर मृत्यूची तयारी सुरू होते. हिरवे पान पिवळे होऊन गळून पडणारच. ती एक भौतिक प्रक्रिया आहे. जन्म झाल्याबरोबर हे भौतिक शरीर मरणाकडे वाटचाल करते. लहान बाळ मरते आणि मूल जन्मते. मूल मरते आणि मुलगा जन्मतो. मुलगा मरतो आणि तरुण जन्मतो. तरुण मरतो आणि म्हातारा जन्मतो. जन्ममरण ही भौतिक, ह्या ठिकाणी शारीरिक प्रक्रिया आहे. ह्या जन्म-मृत्यूला नियती म्हणत नाहीत.

श्री. वसंतराव पळशीकर यांनी *नवभारत* मे १९९८ च्या अंकात लिहिले आहे की, "जन्म आलेला माणूस एक दिवस मरणार हे जसे नियत आहे, व या अर्थाने मृत्यू ही नियती आहे." मृत्यू ही नियती नाही. मृत्यू ही जन्माची अखेर आहे. हिरवे पान पिवळे होऊन गळून पडणार, तसे हे कोमल शरीर सुदृढ होत होत सुरकतून मरणार. ती एक भौतिक प्रक्रिया आहे. योग्य वेळी मूल रांगायला लागणे, उभे राहणे, चालायला लागणे, धावणे, दमणे, पांढरे केस होणे – ह्या सगळ्या शारीरिक क्रिया आहेत, भौतिक प्रक्रिया आहेत. नियती नव्हे.

नियती हा आध्यात्मिक शब्द आहे.

जेवण पोटभर झाल्यावर ढेकर येणे, ही शारीरिक घटना आहे, नियती नव्हे. अन्न पचल्यावर पुन्हा भूक लागणे ही नैसर्गिक प्रक्रिया आहे, नियती नव्हे. पाणी तापवल्यावर वाफ होणे ही जशी भौतिक घटना आहे तशीच विस्तवावर पाय पडल्यावर कातडी भाजणे ही परिणामस्वरूपाची घटना आहे, नियती नव्हे.

मग नियती म्हणजे काय?

नियती म्हणजे काय हे समजण्यासाठी नियतीच्या विरुद्ध काय आहे ते पाहू. नियतीच्या विरुद्ध असलेला माणूस आपल्या स्वतःला कर्तासवरता म्हणवतो. मी अमूक करतो, मी तमूक करतो; मी शिकतो, काम करतो, शेती पिकवतो, कामधंदा करतो; यँव करतो आणि तँव करतो. या सगळ्या म्हणण्यामध्ये तो आपला मी कारणीभूत असल्याचे समजतो. म्हणजेच त्याच्या सगळ्या करण्यामध्ये अहंकार असतो. कधीकधी असे लक्षात येते की, मी सगळे व्यवस्थित करूनही काम पार पडत नाही, अर्धवटच राहते. मी शेतीची मशागत करतो, पेरणी करतो; पण पाऊस पडला नाही, तर धान्य उगवत नाही. अशा वेळी कर्तासवरता मी कुंठित होतो, गोंधळतो. मी श्वासोच्छ्वास करतो; पण कधीतरी श्वास मध्येच अडतो आणि हृदय बंद पडते. अशा वेळी मीचे कर्तेपण कोठे जाते? आता मी झोपतो असे म्हणणारा माणूस एखादे वेळी बराच वेळ अंथरुणावर तळमळत पडतो तरी झोप लागत नाही. आणि मग केव्हा झोप लागली तेही कळत नाही. अशा वेळी मी आता झोपतो म्हणणाऱ्याचे कर्तेपण कामी का आलेले नसते? सुखाचा सगळा जामानिमा असूनही कोणाकोणाला सुखी का होता येत नाही? त्या वेळी मी असे करीन, मी तसे करीन, मी काहीच्या बाही करीन असे म्हणणाऱ्याचे कर्तेपण व्यर्थ का होते?

"सुख-दुख के लिए जो क्रियाएं करता है व्यक्ति, ऋषि ने उसे ही कर्ता कहा है – द डुअर। जो सुख-दुख के लिए क्रियाएं करता है, जो मांगता है कि सुख मुझे मिले और दुख मुझे न मिले; यह कर्ता है। लेकिन जो कहता है कि जो मिले ठीक, न मिले ठीक; दोनों में भेद ही नहीं करता, वह अकर्ता हो जाता है। वह नॉनडुअर हो जाता है।"

या ठिकाणी प्रचलित असलेला गैरसमज उफाळून वर येण्याचा धोका आहे. वह अकर्ता हो जाता है, हे वाक्य वाचल्यावर असे वाटते की, मग सगळे आळशीच होणार,





कोणीही कामच करणार नाहीत. नाही, असा अर्थ नाही त्या वाक्याचा. त्या वाक्याचा अर्थ असा आहे की, त्या कर्त्यामधला 'मी' नाहीसा होणांर, अहंकार नष्ट होणार. कर्म मात्र चालूच राहणार. वह अकर्ता हो जाता है म्हणजे वह (अकर्ता = ) अहंकारशून्य हो जाता है असा अर्थ आहे. आणि जगातल्या सगळ्या तत्त्वज्ञानांचा, प्रार्थनांचा हाच एकमेव उद्देश आहे की, अहंकार सोडा, मीपण टाका. प्रार्थनेत मागणी केव्हा घुसली कोणास ठाऊक, पण मूळ प्रार्थनेत समर्पण असते. ते समर्पण फुलांचे, धनाचे, वस्तूंचे असण्यापेक्षा अहंकाराचे असते. फुले, धन, वस्तू ही निमित्ते असतात. ती फुले, धन, वस्तू टाकताना ह्या वस्तूंबरोबर, देवा, मी माझे मीपण, माझा अहंकार अर्पण करीत आहे असा भाव असेल तरच ती प्रार्थना होते. नमाज पढताना जमिनीला हात, पाय आणि डोके टेकून कर्तेपणाची साधनइंद्रिये आणि डोक्यातला अहंकार अर्पण केला तरच ती प्रार्थना होते. म्हणून पुन्हा लक्षात घ्यावे लागते की, 'वह अकर्ता हो जाता है' म्हणजे तो निष्क्रिय, आळशी होतो असे नव्हे, तर तो अहंकारशून्य होतो, मी कर्ता आहे या भावनेपासून मुक्त होतो.

गीतेच्या चवथ्या अध्यायातील तेराव्या श्लोकात म्हटले आहे की, 'तस्य कर्तारमपि मां विद्धि अकर्तारम् अव्ययम् ।'

"करते हुए भी मैं अकर्ता हूं. कृष्ण का ऐसा वचन गहरे में समझने योग्य है। पहली, कर्म से कर्ता का भाव पैदा नहीं होता। कर्म अपने आप में कर्ता का भाव करने वाला नहीं है। कर्ता का भाव भीतर मौजूद हो, तो कर्ता का भाव कर्म के उपर सवार हो जाता है । भीतर अहंकार हो, तो कर्म पर सवारी कर लेता है। ऐसे कर्म अपने आप में, कर्ता के भाव का जन्मदाता नहीं है।

"तो कृष्ण की बात तो छोड़ें एक क्षण को, हम भी चाहें, तो कर्म करते हुए अकर्ता हो सकते हैं। कर्म ही कर्ता का निर्माता नहीं है; कर्ता का निर्माता अहंकार का भाव है। और अहंकार का भाव इतना अद्‌भुत है कि आप कुछ ना करे, तो भी कुछ न करने का कर्ता भी बन जाता है।

वसंतराव पळशीकर यांनी नियतीचा अर्थ सांगताना (*नवभारत*, मे १९९८) म्हटले आहे की, "जगाचे नियंत्रण करणारी एक शक्ती आहे, ती काय घडणार ते आधीच सगळे ठरवून ठेवते, व आपण कितीही प्रयत्न केले तरी तिने ठरविलेले असते तेच अखेरीस घडते; कारण ते घडणेच नियत असते ही नियतीविषयीची एक धारणा. ही माणसाला निष्क्रिय, हताश, परावलंबी वनवितेच असे नाही. आपण आपल्या सदसद्विवेकाला अनुसरून नैतिक कर्तव्याचे कसोशीने पालन करावे, तेवढेच आपल्या हाती असते; शेवटी जे घडणार आहे तेच घडणार, या भूमिकेतूनही माणसे जगतात. 'नियती'ची संकल्पना ईश्वरी इच्छा वा निर्णय याच्याशीच जोडलेली असायला हवी असे काही नाही. ती इहवादी संकल्पनापण असू शकते."

पळशीकरांच्या वरील मजकुरातील आणि ऋषीच्या म्हणण्यातील आशय वेगवेगळा आहे. पळशीकरांच्या मजकुरातील आशयातून कर्तेपणाचा – मीपणाचा – अहंकाराचा भाग वगळलेला नाही. ऋषीच्या म्हणण्यातील मुख्य आशय कर्तेपण वगळणे हा आहे. दुसरे असे की, पळशीकर यांनी म्हटले आहे की, 'नियती'ची संकल्पना ईश्वरी इच्छा वा निर्णय याच्याशीच जोडलेली असायला हवी असे काही नाही, ती इहवादीपण असू शकते. ऋषीचे म्हणणे असे की, 'नियती'ची संकल्पना इहवादीच आहे, अहंकार सोडणे, कर्तेपण सोडणे हे इहवादीच आहे, ईश्वरी वगैरे काही नाही.

यावर कोणी असे म्हणेल की, माणसाने अहंकार सोडला, मन सोडले तर मग माणूस कोणतेही काम करावयास का उद्युक्त होईल? अहंकार नसेल तर मग माणूस हा माणूस राहील काय? त्याला कशाचे मोटिव्हेशन राहणार? तो उभारी तरी कशी धरणार?

असा प्रश्न पडणे साहजिक आहे हे हेरूनच त्याचेही उत्तरादाखल चिंतन केले गेले आहे.

"मन तो एक अण्डे की तरह है। अण्डा जब टूटता है तो पक्षी पंख फैलाकर आकाश में उड़ता है। और अण्डा अगर रुका रह जाये, तो जो अण्डा पक्षी को सम्हालने के लिए था, उसकी सुविधा और व्यवस्था के लिए था, उसकी सुरक्षा के लिए था, वही – वही उसके लिए कब्र बन जायेगा। अण्डे को टूटना ही चाहिए।

"मन जरूरी है। आदमी बिना मन के पैदा हो, तो वैसा ही होगा जैसा बिना अण्डे के कोई पक्षी पैदा हो, तो मुश्किल में पड़ जाये। मन बिलकूल जरूरी है; लेकिन अण्डे की तरह जरूरी है। एक सीमा तक साथी है, एक सीमा के बाद दुश्मन हो जाता है। एक जगह तक बचाता है, एक सीमा के बाद हानि पहुंचाने लगता है। एक सीमा तक सहारा है, एक सीमा के बाद कारागृह हो जाता है।

"मन के साथ हमारा तादात्म्य, हमारी आइडेन्टिटी गहरी है। हमने अपने को मन के साथ एक समझ रखा है। और इस तरह पक्षी अण्डे के बाहर होने में असुविधा पाता है, उपाय नहीं रह जाता।

"ध्यान मन के तोड़ने का नाम है। या मन के ठहरने का नाम, या कहे मन के तोड़ने का नाम, या कहे मन के पार हो जाने का नाम, इससे कोई भेद नहीं पड़ता।"

मन तोडणे, मनाच्या पार होणे म्हणजेच मी नष्ट होणे, अहंकार नसणे. आणि अहंकार गेला, म्हणजेच मी कर्ता आहे असा भाव गेला की, माणूस अकर्ता होतो. आता पुन्हा मघाचे म्हणणे जोडून घेऊ. ऋषी म्हणतो की,

"और जब व्यक्ति अकर्ता होता है, तो परमात्मा कर्ता हो जाता है।

"इसी से भाग्य की कीमती धारणा पैदा हुई। भाग्य का मतलव ज्योतिषी से नहीं है। भाग्य का ख्याल वहुत आध्यात्मिक है। उसका हाथ की रेखाओं से कुछ लेना-देना नहीं है। और भविष्य से कुछ संबंध नहीं है। भाग्य की धारणा ही इससे पैदा हुई है, जब मैं कर्ता नहीं हूं, और चीजें तो हो ही रही हैं। चीजें तो घटित हो रही है और मैं कर्ता नहीं हूं। क्योंकि कर्ता मैं तभी तक होता हूं, जब तक मैं मांगता हूं कि सुख मिले और दुख न मिले। तब तक संघर्ष करता हूं तो कर्ता होता हूं। (म्हणजे मनाने मागणी करण्यावर कर्ता हा छाप बसतो, मागणी न करण्यावर अकर्ता हा छाप बसतो. पुन्हा म्हणजे, कर्ता किंवा अकर्ता हे कर्म करण्यावर किंवा न करण्यावर अवलंबून नाही; कर्म तर होतच राहणार. कर्म न केल्यामुळे अकर्ता होत नाही, तर कर्मापासून मागणी न केल्यामुळे अकर्ता होतो. कर्म केल्यामुळे कर्ता होत नाही, तर मागणी केल्यामुळे कर्ता होतो. मागणी करणे हा अहंकाराचा भाग आहे, आणि मागणी न करणे हा अहंकार गळून पडल्याचा भाग आहे. निष्क्रियतेचा येथे भागच येत नाही.) अब कर्ता नहीं रहा। अब जो मिल जाये ठीक है। मैनें फिक्र ही छोड दी मिलने – न मिलने की। (पुनःपुन्हा लक्षात घ्यावे लागते की, ही अल्पसंतुष्टता नसून फिक्र-छोडना आहे, मिळणे – न मिळणे ह्या हावेच्या पलीकडे जाणे आहे. आणि फिक्र छोडना कोण करील? अहंकार नसलेली स्थिती करील. कारण जोवर अहंकार आहे तोवर फिक्र करना राहणारच. अहंकारच गळून पडला तर फिक्र करना हा जो त्याचा गुणधर्म होता तोही गळून पडणार. अहंकार नसलेल्या स्थितीला फिक्र ही गोष्ट माहीत नसणार. ती स्थिती फक्त कर्म करीत राहणार. आपल्या मुलाशी खेळताना बाप जसा अहेतुकपणे घोडाघोडा खेळतो तसा अहेतुकपणा सगळ्या जगण्यात अवतरणार.) सुख आए तो मैं फिक्र नहीं करता कि सुख है। दुख आए तो मैं फिक्र नहीं करता कि दुख है। (या वाक्यातला 'मैं' अहंकारनिदर्शक नसून, केवळ अहंकारशून्य स्थितीसाठी वापरला आहे. भाषेची ही अडचण, दुर्वलता समजून घ्यावी.) धीरे-धीरे भेद ही गिर जाता है और पहचानना ही मुश्किल हो जाता है कि क्या सुख है, और क्या दुख है। दोनों के बीच आदमी निर्लिप्त हो जाता है।

"ऐसी जो निर्लिप्तता है, इसमें तो कर्ता खो जायेगा। क्योंकि करने को कुछ बचा नहीं। (याचा अर्थ असा नाही की निष्क्रियता आली. याचा अर्थ असा की, मागणीयुक्त, वासनायुक्त कर्म सुटले; निव्वळ कर्म मात्र राहिलेच राहिले.) करना था ही क्या? एक ही था : सुख कैसे पायें और दुख से कैसे वचे? वही करना था। अब कर्म का कोई उपाय न रहा, फिर भी चीजें तो होती ही चली जाती है। जब व्यक्ति कर्ता नही रह जाता तो परमात्मा कर्ता हो जाता है। (इथे पुन्हा परमात्मा ह्या शब्दाने बिचकायचे नाही. हा परमात्मा शब्द परलोकवादी ईश्वर नाही. हा परमात्मा इहवादीच आहे हे लक्षात घ्यायला हवे. आत्मा म्हणजे व्यक्तिव्यक्तीमधली अहंकारशून्य स्थिती. आणि परमात्मा म्हणजे समस्त व्यक्तींमधली अहंकारशून्य स्थिती. समस्तपणा सुचवण्यासाठी परमात्मा हा शब्द योजावा लागतो. परम+आत्मा म्हणजे परमात्मा. काय करणार, शब्दांचे पलीकडे सांगतानासुद्धा शब्दांचाच वापर करावा लागतो!) और जव परमात्मा ही कर्ता हो जाता है इस भावदशा का नाम ही भाग्य है, विधि है, नियति है।

पुन्हा नीट लक्षात घ्या की, नियती म्हणून काही एक शक्ती, कोणी एक व्यक्ती असे येथे म्हटलेले नाही. 'इस भावदशा का नाम' असे म्हटलेले आहे. भावदशा हा शब्द दुर्लक्षित केला, किंवा झाला, तर पुन्हा पहिले पाढे पंचावन्न! ह्या नियतीनेच भारतीय लोकांना निष्क्रिय केले, वगैरे वगैरे. 'भावदशा' ही स्थिती आपणच आपल्याला प्राप्त करून घ्यायची आहे. आणि तशी भावदशा साधली तर आणि तरच आपण 'निर्लिप्त' होणार, दुःखमुक्त होणार. बरोबर शब्द वापरायचा तर सुखदुःखमुक्त होणार. आणि आपली अडचण येथेच येते. आपल्याला फक्त दुःखमुक्त व्हायचे आहे, सुखमुक्त व्हायचे


अनुक्रमणिका

नाही. पण निर्लिप्त स्थिती म्हणजे सुखदुःखमुक्तता. सुख हवे, पण दुःख नको, अशी चालवाजी अध्यात्मात चालत नाही; हेही, कठोरपणे नव्हे, पण प्रसन्नपणे लक्षात घ्या.

आता पुन्हा मूळ प्रवचनाकडे वळू.

"ऐसे व्यक्ति की गर्दन काट दो तो वह कहता है, कटनी थी। वह इसमें उसको भी दोषी नहीं ठहराता है जिसने काटी, क्योंकि अव मानता है कि कर्ता कोई है नहीं। कटनी थी। कर्ता विलीन हो गया। (लक्षात घ्या की, 'कर्ता' फक्त आपल्यातला गेला असे नव्हे, तर दुसऱ्यातलाही गेला असे मानले तरच नियती ही संकल्पना अनुभवाला येणार; नाही तर नाही.) ऐसे व्यक्ति को जहर पिला दो, तो वह कहता है पीना था, होना था। (ह्या परलोकीच्या गप्पागोष्टी नाहीत, इहलोकातच मीरेने विष घेतले, सॉक्रेटिसने विष घेतले, कुरकुर न करता.) और जो व्यक्ति जहर पिलाते वक्त भी जानता हो की होना था, क्या उसके मन में क्षणभर को भी क्रोध आ सकता है उसके प्रति जिसने जहर पिला दिया? क्योंकि अब वह मानता ही नहीं कि कोई कर्ता है। इसलिए अव दोषारोपण समाप्त हुआ। इसलिए अव कोई जिम्मेदार है, यह वात ही खत्म हुई। अव जो भी हो रहा है, वह परम नियति है। इसमें व्यक्ति का कोई लेना-देना नहीं है। ऐसा व्यक्ति अगर परम शांति को, परम संतोष को उपलव्ध हो जाये तो आश्चर्य क्या है?

"जो सुख-दुख के बीच चुनाव करता है, वह कभी संतोष को उपलब्ध नहीं हो सकता। जो सुखदुख में भेद करता है (म्हणजे त्याच्यातला कर्ता अजून शिल्लक आहेच की!) वह कभी संतोष नहीं पा सकता। जिसने सुख-दुख का भेद ही छोड दिया, वह संतुष्ट है। इसलिए जो लोग समझाते रहते है – बड़ी किमती बातें भी कभी बहुत ना-समझी के आधार बन जाती हैं।

"लोग कहते है संतोष में ही सुख है। पागल है बिलकुल। उन्हें संतोष का पता ही नहीं। अभी भी वे सुख को ही संतोष के साथ एक कर रहे है। और वे जिनको समझा रहे हैं, इसलिए समझा रहे है कि अगर सुख चाहते हों तो संतोष रखो। और जो सुख चाहता है, वह संतुष्ट नहीं हो सकता। क्योंकि सुख असंतोष का सूत्र है। जो सुख चाहता है, वह दुख से बचेगा ही; नहीं तो सुख चाहा नहीं जा सकता। तो संतुष्ट कैसे होगा? सुख संतोष नहीं है, संतोष सुख नहीं है। संतोष सुख-दुख के पार है। और संतुष्ट वही है, जिसने सुख-दुख का भेद ही त्यागा। संतोष दोनों को अतिक्रमण करता है। इसलिए आप अगर कभी सुख मानकर संतोष कर रहे हों तो भ्रांति में मत पड़ना, आपका संतोष निपट धोका है।

"नियति, भाग्य, विधी परम आध्यात्मिक शब्द है। व्यक्ति अहंकार से मुक्त हुआ यह उनका प्रयोजन है। अस्मिता नहीं है अव। शिकायत नहीं है अव। जो हो रहा है उसकी परम स्वीकृति है – द टोटल एक्सेप्टेन्स। उससे अन्यथा की कोई चाह भी नहीं है। इससे अन्यथा होना चाहिए या इसका कोई स्वप्न भी नहीं है।

"ऐसा जो तथाता है, ऐसा जो भाव है स्वीकार का, यह अगर आपके भीतर की सारी लहरों को शांत कर जाये, तो आश्चर्य क्या? सव लहरें खो जाये तो आश्चर्य क्या? और इस लहर के खोने में ही आप भीतर... और भीतर... और भीतर प्रवेश करते चले जाते है।" (*रजनीश*)

आता राहता राहिली एक गोष्ट. वसंतराव पळशीकर यांनी म्हटले आहे की, "काँग्रेसच्या विस्तीर्ण वटवृक्षाच्या छत्रछायेखाली देश स्वातंत्र्यानंतर दीर्घकाळ राहिला. पण जन्म आलेला माणूस एक दिवस मरणार हे जसे नियत आहे, तसेच या काँग्रेसच्या वटवृक्षाची वेगवेगळ्या कारणांनी पडझड होत, तो आतून पोखरला जात, तो एक दिवस कोसळावा ही ऐतिहासिक नियतीच होती असे म्हणणे गैर का वाटावे?"

(*नवभारत*, मे १९९८)

गैर वाटण्याचे कारण काँग्रेस हा पक्ष आहे, माणूस नाही. संस्था आहे, माणूस नाही. नियती शब्दाची योजना माणसाच्या निरहंकारी भावाशी जोडलेली आहे. काँग्रेस पक्ष कोसळणे हा परिणाम आहे, नियती नाही. कशाचा परिणाम आहे? तर पक्षातले सभासद, पदाधिकारी, अध्यक्ष, मंत्री, महामंत्री हे भ्रष्टाचारी झाले, भ्रष्टाचार करते झाले. कर्ते झाले. त्यांनी ते परमात्म्यावर सोपवले नाही. त्यांनी स्वतःच गुन्हे केले, पैसे खाल्ले, दुसऱ्या खासदारांना खाऊ घातले. ते महामंत्री निष्क्रियसुद्धा राहिले. मनःपूत वागले. मनाला येईल तसे वागले. आपली धनाची वांच्छा पुरी व्हावी म्हणून पक्षहित, देशहित, परम हित बाजूस ठेवले. त्याचा परिणाम पडझडीत झाला, पक्ष पोखरण्यात झाला. यात नियती-तत्त्वज्ञानाचा भाग येतच नाही. म्हणून तसे म्हणणे गैर आहे.

इंग्लंडमध्ये हुजूर पक्ष आहे, उदारमतवादी पक्ष आहे,

मजूर पक्ष आहे. ते कुठे कोसळतात? त्यांना का ऐतिहासिक नियती नाही?

जर काँग्रेस पक्ष सुखदु:खाच्या अतीत गेला असता, कर्तेपणाचा भाव पक्षाने सोडला असता, आणि मग पक्ष कोसळला असता, तर ती नियती म्हणता आली असती. मग ते म्हणणे गैर वाटले नसते.

जन्म आणि मृत्यू ह्या दोन्ही गोष्टी माणसाच्या स्वाधीन नाहीत. नियती मात्र माणसाची स्वकमाई आहे.

---

**श्री. वसंत पळशीकर लिहितात :**

नियतीविषयक श्री. देवीदास वागूल यांचे टिपण वाचले. 'ऋषीं'चे म्हणणे आचार्य रजनीश यांनी सांगितले आहे आणि त्या आधारे वागूल यांनी त्यांचे विवेचन केले आहे. जेव्हा माणूस अकर्ता या पदवीला पोचतो तेव्हा केवळ 'घडणे' उरते. गोष्टी घडत राहतात. मग कर्ताकरविता कोण असतो? तर, रजनीशांच्या शब्दात, "जब व्यक्ति कर्ता नही रह जाता तो परमात्मा कर्ता हो जाता है." यावर वागूलांचे जे स्पष्टीकरण आहे ते असे की, "परमात्मा म्हणजे समस्त व्यक्तींमधील अहंकारशून्य स्थिती." पण हे त्यांचे स्पष्टीकरण समाधान देत नाही. रजनीशांच्या शब्दात, "और जब परमात्मा ही कर्ता हो जाता है इस भावदशाका नाम ही भाग्य है, विधि है, नियति है". ही भावदशा अकर्ता बनणाऱ्या व्यक्तीची आहे. ती अशी की, कर्ताकरविता तो परमात्मा, परमात्म्याला 'अहंकार' असणे परमात्म्याच्या कल्पनेत बसत नाही. पण 'समस्त व्यक्तींमधील अहंकारशून्य स्थिती' म्हणजे परमात्मा हे पटत नाही.

मी कृती करतो असे मला वाटते तीही खरे तर मी करीत नसतो; ज्या अन्य व्यक्ती ज्या कृती करीत असतात व त्यांना आपण त्या करीत आहोत असे वाटत असते त्याही खरे म्हणजे त्या करीत नसतात. माझ्या व त्यांच्या करवी त्या घडत असतात; कर्ता तो परमात्मा आहे, ही भावदशा प्राप्त झाली की काय होते? एका पातळीवर जे जे घडते त्या प्रत्येक कृतीची कार्यकारणमीमांसा करता येतेच; त्या पातळीवर व्यक्ती 'कर्ता' आहेत असे गृहीत असते व गृहीत राहते. अशी कार्यकारणमीमांसा गरजेचीही राहते व उपयोगीही असते. पण, त्याच वेळी, उच्चतर वा 'खऱ्या' पातळीवर, मला व इतरांना, व्यक्तींना अमूक-तमूक कृती करण्याची प्रेरणा देणारा, कृती करण्यास प्रवृत्त करणारा कर्ताकरविता कोणी वेगळाच आहे असा प्रत्यय असतो. *जे जे घडते ते ते तसे तसे त्या त्या क्रमाने, त्या त्या परिणामांसह घडणारच होते/असते, ते ते घडणार हे ठरलेलेच होते/असते; मी/आपण कर्ते आहोत या भ्रमापोटी मी/आपण माझ्या/आपल्या निर्णयानुसार कृती करून काय काय घडणार ते ठरवू शकतो, बदलू शकतो असे व्यक्तींना वाटते; पण परमात्मा हाच कर्ताकरविता आहे हेच सत्य आहे.* ही भावदशा बनते. याचा अर्थ खरे कर्तेपण त्या परमात्म्याचेच केवळ आहे हे सत्य मी स्वीकारतो. आणि मग जे जे काही घडते ते ते घडणे हे नियतीचा भाग बनते.

म्हणूनच नियती ही आध्यात्मिक गोष्ट ठरते. इहवादी व्यक्ती वरील अर्थाने नियतीला तिच्या संकल्पनाविश्वात स्थान देऊ शकत नाही.

रजनीश (वा ते पुढे करतात तो 'ऋषी') परमात्म्याविषयी येथे तरी काही सांगत नाहीत. ती 'शक्ती' म्हणूनही तिच्याकडे बघता येते; काही तिला व्यक्तीच्या रूपात बघतात. यामुळे खरोखर काही फरक पडतो का? की काही वेगळ्या कारणामुळे पडतो?

कर्तेपण टाकून देण्याच्याही वेगवेगळ्या रीती असतात. मीपणा तसाच राखून कर्तेपण टाकून देऊ पाहणाऱ्या, कमीअधिक प्रमाणात पार खचून गेलेल्या व्यक्ती आपणांस भेटतात. दैववादी बनणे हीदेखील मीपणा टिकवून, कर्तेपणाची काही भूमिका पार पाडीत राहूनही कर्तेपणा नाकारण्याची एक रीत आहे. मीपणा टाकून देऊन कर्मयोग तेवढा समरसून व अभिक्रमशीलतेने चालू ठेवावयाचा यासाठी स्वत:ला त्या कर्त्याकरविता परमात्म्याच्या स्वाधीन करावयाचे, ही आणखी एक रीत. पण म्हणजे काय? इहलौकिकदृष्ट्या, व्यवहारात तीच व्यक्ती विचार करताना, सारासार विवेक करताना, निर्णय घेताना दिसते. मीपणाशिवाय या साऱ्या क्रिया घडतात म्हणजे काय घडते याचे स्पष्टीकरण मिळण्याची गरज आहे.

आता, माझा मीपणा पूर्णतया गळून पडला आहे, जी जी कृती मी करीत आहे ती ती कृती वस्तुत: तो परमात्माच करतो आहे, असे विधान कोणतीही देहधारी मानवी व्यक्ती करू शकत नाही. कारण हे विधान मीपणा शिल्लक उरल्याचाच पुरावा ठरतो. यातून सोडवणूक करून घेण्यासाठी, काही व्यक्ती या लौकिक दृष्टीला जरी मानवी म्हणून अनुभवाला येत असल्या तरी त्या परमात्म्याचा पृथ्वीतलावरील अवतार

असतात, असे इतर लोक त्या व्यक्तीविषयी अनुभवाच्या, प्रत्ययाच्या आधारे म्हणतात असे इतिहासात आढळते. अवताराच्या पातळीवर नियती, भाग्य, विधिलिखित यांचे प्रयोजनच उरत नाही.

ही नियतीच होती, भाग्यात जे असेल ते वाट्याला येईल, विधिलिखित टळणार नाही ही सर्व विधाने माणसेच करू शकतात.

ज्या अवतारी व्यक्ती – स्त्रिया वा पुरुष – नाहीत त्या व्यक्तींच्या बाबतीत कर्तेपणाचा एरव्हीचा अहंकार गळून पडल्यावरही, स्वतःसाठी काही करावयाचे उरले नाही असे झाल्यावरही, अवशिष्ट असा मीपणा राहतो असे म्हणावे लागते. ज्ञानेश्वर, तुकाराम, गाडगेमहाराज ही संत मंडळी निरंहकारी भावदशेच्या जवळात जवळ पोचलेली होती, 'राहिलो उपकारापुरता' अशी त्यांची सेवकाची भूमिका होती असे आपण म्हणू. कर्ताकरविता तो परमात्मा आहे असे म्हणत असतानाही, मीच तो परमात्मा आहे असे ते कधी म्हणाले नाहीत. हा केवळ एक सभ्यतेचा, नम्रता दाखविण्याचा भाग नव्हता.

सत्कर्म, कर्तव्य यांचे साक्षात ज्ञान व्यक्तीला होत नाही याचे कारण त्याच्या मीपणाने (अहंकार वा स्वार्थ) निर्माण केलेला पडदा त्याला हे ज्ञान होण्याच्या आड येतो. ज्याचा मीपणा गळून पडला त्याला सत्कर्म कोणते, कर्तव्य काय याचे ज्ञान प्रकट होते. त्या आधारे त्याच्या हातून कर्म घडते. ते अर्थातच निष्काम कर्म असते. तो 'अकर्ता' या पदवीला पोचतो. तरीही, स्वतःचा मानव असण्याचा प्रत्यय त्याला नित्य देहधर्म, मनोव्यापार यांच्यामुळे येत राहतो तोवर पुढील अंतर शिल्लक राहते. प्रकट झालेले सत्कर्म, कर्तव्य यांचे ज्ञान होणारी व्यक्ती मानवच असते आणि मानव या नात्यानेच तिच्या कडून कर्म घडत असल्याने त्या कर्माचे मानवी कृती हे स्वरूप कायम राहतेच; ते परमात्म्याने केलेले कर्म ठरत नाही. म्हणून अशी व्यक्तीही नियती असेल तेच होईल या भाषेत बोलते.

सुखदुःखमुक्त, अकर्ता व्यक्तीच्या मान कापली जाण्याचे उदाहरण बागूल यांनी दिले आहे (म्हणजे रजनीशांनी दिले आहे.) "गर्दन काट दो तो वह कहता है की, कटनी थी।" तो यासाठी गर्दन काटणाऱ्याला दोषी धरत नाही. 'कटनी थी' असे ती व्यक्ती म्हणजे तेव्हा, परमात्म्याच्या योजनेनुसार गर्दन काटली जाणार ही गोष्ट आधीच ठरलेली होती, आणि म्हणून तसे घडणे टळणारे नव्हतेच, असे त्या व्यक्तीला म्हणावयाचे असते. दोष न देण्याचे कारण, जो गर्दन छाटतो तो अकर्त्याच्या भूमिकेत गेलेला असतो असे नाही; तर, ज्याची गर्दन छाटली जाते त्याच्या दृष्टीने एका पातळीवर परमात्मा हा एकच खरा कर्ता असतो; याचाच अर्थ तेही कृत्य परमात्म्याच्या इच्छेनेच घडते ही त्याची धारणा असते म्हणून. आणि जर परमात्मा हाच फक्त खऱ्या अर्थाने जे जे घडते त्याचा कर्ता असतो हे त्या व्यक्तीचे ज्ञान असेल, बोधी असेल, तर ती व्यक्ती दोष न देणे येथेच थांबणार नाही; ती याही कृत्याचा आनंदाने स्वीकार करील. जसा सॉक्रेटिसने त्याला झालेल्या सजेचा केला. पण लौकिक पातळीवरच्या अथिनियन ज्युरीच्या कृत्याचा निवाडाही त्याने केला हे पण बागुलांनी ध्यानात घ्यायला हवे.

रजनीश त्यांच्या 'ऋषी'च्या आधारे मामला जरा अतीच बाळबोध करून टाकायचा यत्न करतात, व बागूल त्यांच्या निरुपणाने जिंकले जातात. पण मला वाटते की, मीपणाचा अहंकार, मी-माझे यांच्याशी जोडलेला स्वार्थ या गोष्टी गळून पडल्या तरी, व्यक्ती सुखदुःखमुक्त झाली, जे घडते तिचा तिने स्वीकार केला तरी, ती व्यक्ती मानव राहते तोवर लौकिक व्यवहारांच्या जगात एका पातळीवरील तिचे कर्तेपण शिल्लक राहते. कर्ताकरविता 'तो' असे म्हणणारी व्यक्तीही, तिला बोध प्राप्त झाला असला तरी, हे कर्तेपण स्वीकारते. त्याच्या चौकटीत निवाडेही करते. असो.

जो जन्माला आला तो मरणार हे ठरलेलेच आहे, अटळ आहे; या मर्यादेत मरण हे 'नियत'ही आहे असे म्हणणे चूक नाही. पण मृत्यू ही नियती आहे असे लिहिण्यात नियती या शब्दाचा वापर मी ढिलाईने केला गेला, व हे चुकले, हे बागूल यांचे म्हणणे योग्य आहे.

जे जे लौकिक जगात घडते त्याची त्याची कार्यकारण मीमांसा करता येते. कारण लौकिक असते ते एका अंगाने भौतिक, शारीरिक असतेच असते. तेव्हा 'परिणामस्वरूपी घटनां'ना उद्देशून नियती हा शब्द वापरता येत नसेल तर लौकिक जीवनाच्या कोणत्याही संदर्भात हा शब्द वापरता येणार नाही. परमात्मा हाच कर्ता उरतो तेथेही लौकिक जगात ज्या गोष्टी घडतात त्या एका अंगाने भौतिक घटना असतातच ना? वर गर्दन छाटण्याचे जे उदाहरण आले आहे त्यातही एक न एका भौतिक कार्याचाच गर्दन छाटली गेली हा परिणाम आहे असेच म्हणायला लागेल.



अनुक्रमणिका

जो इहवादी असेल तो माणसांच्या पलीकडे कोणी कर्ता मानीत नाही. निसर्गनियमांनुसार काम करणाऱ्या 'आंधळ्या', शक्ती तो मानील. पण या शक्ती कर्ता पदवीला पोचत नाहीत. मीपणा गळून पडणे ही गोष्टही इहवादी माणसाला एका मर्यादेपर्यंतच मान्य होईल. व्यक्तीचे निरंहकारी, निस्वार्थी बनणे, जास्तीत जास्त परोपकारी बनणे तिला कळू शकेल, पटू शकेल. 'अकर्ता' बनणे तिला समजू व पटू शकणार नाही. कर्त्या माणसांच्या कृती, निसर्गसृष्टीत घडणाऱ्या गोष्टी यांच्या आघात-प्रत्याघातांचा परिणाम व परिणती म्हणून भूत-वर्तमान-भविष्य अशी वाटचाल होत असल्याने, निसर्ग-नियमांनुसार काही परिणाम घडणे, अमूक एक परिणती होणे हे नियत आहे, अटळ आहे असे इहवादी व्यक्ती म्हणेल, पण नियती हा शब्द तिच्या शब्दकोशामध्ये नसेल.

लोकशाही राज्यप्रणालीचा स्वीकार केल्यावर, सर्व विभिन्न समाजघटक व वर्ग यांना एकत्र आणून, त्यांची एक मोट बांधून, व्यापक आघाडीद्वारे स्वातंत्र्यासाठी चळवळ केलेला काँग्रेस पक्ष हा, लोकशाही राज्यप्रणालीचीं असलेली स्वतःची एक आंतरिक तर्कसंगत गतिकी (इंटर्नल लॉजिक अँड डायनॅमिक्स) ध्यानात घेता, कितीही प्रयत्न केला तरी एक ना एक दिवस कोसळणारच होता असे म्हणता येते असे मला वाटते. एक ना एक दिवस हे घडणार हे ठरलेलेच होते, या अर्थाने ती नियती होती असे म्हणणे अगदीच गैर आहे असे मला वाटत नाही. म्हणून 'ऐतिहासिक' हे विशेषण मी वापरले. परमात्मा कोणी आहे, तोच एकमेव खरा कर्ता आहे, त्याची ही योजना होती, त्या अर्थाने काँग्रेसचे कोसळणे ही नियतीच होती, हा अर्थ मला अभिप्रेत नव्हता.

पण परमात्माच एक कर्ता उरतो ही जी भूमिका रजनीशांनी मांडली आहे ती ज्या व्यक्तींची भूमिका असेल त्या व्यक्ती, गर्दन छाटली जाण्याच्या उदाहरणातल्याप्रमाणे, 'कटनी थी'च्या चालीवर काँग्रेस पक्ष कोसळणारच होता असे म्हणतील, सुखदुःखमुक्त भावदशेमधून कोसळण्याचा स्वीकार करतील, आणि भाग्य, विधी, नियती या शब्दांचा वापर करतील. त्यांच्या स्वतःच्या जीवनात मीपणा गळून पडलेला असेल असेही नाही. गतानुगतिकतेमधून भाविकपणे, स्वीकारलेल्या दार्शनिक-आध्यात्मिक भूमिकेपोटीही ही भाषा ते प्रामाणिकपणे वापरतील हे शक्य आहे. प्रयत्नवादी, प्रवृत्तीपर असूनही ते तसे म्हणतील हे शक्य आहे हे पण विसरू नये.

घडणाऱ्या गोष्टींचा असा स्वीकार करण्यात एक अर्थ व एक बळ आहे, असेही माझे मत पडते.



---

**लेखक-परिचय**


❖ **स.ह. देशपांडे** : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक (मुंबई विद्यापीठ); शेतकी अर्थशास्त्राचा विशेष अभ्यास; *समाज प्रबोधन पत्रिके*चे भूतपूर्व संपादक; सामाजिक-राजकीय विचारप्रवाह व चळवळी यांचे अभ्यासक; *सावरकर ते भाजप : हिंदुत्वविचाराचा चिकित्सक आलेख, शारद्वत, संघातले दिवस* इत्यादी ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : सी-२८, गंगा-विष्णू संकुल, प्रतिज्ञा हॉलसमोर, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

❖ **देवीदास बागूल** : मराठी साहित्याचे व्यासंगी अभ्यासक व लेखक; ललित कलांचे जाणकार समीक्षक; नामवंत छायाचित्रकार; पुस्तकांची मुखपृष्ठे व मजकूर यांच्या मांडणीच्या विषयात वैशिष्ट्यपूर्ण कार्य. **पत्ता** : ६५/२० कृतांजली अपार्टमेंटस्, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

❖ **आ.ना. पेडणेकर** : इंग्रजीचे निवृत्त प्राध्यापक; लघुकथाकार, कवी व समीक्षक; टॉलस्टॉय यांच्या *वॉर अँड पीस* या अक्षर वाङ्मयकृतीचे संक्षिप्त भाषांतर *युद्ध आणि शांती* प्रसिद्ध. **पत्ता** : ६ अनुपमप्रभा, अमरसी रोड, मालाड (प.), मुंबई ४०० ०६४.

# PERFECT HOMES ... AT PERFECT LOCATIONS



### SWAPNASHILP

**Ganeshnagar, Off Karve Road**

Luxurious 2 & 3 bedroom flats, Terrace flats & Row Houses

*Facilities :*

Swimming pool, Club House, Developed Garden & Children's play area etc.



### TRINITY COURT

**Koregaon Park**

Luxurious 2 & 3 bedroom flats, Terrace flats & Duplex flats.

Facilities :

Swimming pool, Club House, developed garden & Children's play area etc.



### GARNET RESIDENCY

**Wanawadi, Main Fatima Nagar Road.**

Luxurious 2 & 3 bedroom flats, Terrace Flats & Duplex Flats.



### GARDENIA

**Opp. Viman Nagar**

1,2 & 3 bedroom budget flats, Terrace flats & Pent houses

**Projects approved for Finance by HDFC, CITIBANK, GIC, LIC, CANFIN HOMES**

**READY POSSESSION FLATS**
**Sunshine Court - Kalyninagar**
**Chaitrangan - Kanchan Galli**



**NAIKNAVARE AND ASSOCIATES**

PROMOTERS AND BUILDERS

*Head Office* : 1204/4 Ghole Road, Shivajinagar, Pune 411004 Phone : 91-212-323700 (4lines) Sales Phone : 91-212-321525 (2lines)
Fax : 91-212-324286 *Website* : http://www.naiknavare.com. *Email* : sales@naiknavare.com

*Mumbai* : 1, Vidyabhuvan Society, 121, Keluskar Road, Above Gypsy Restaurant, Near Shivsena Bhavan, Shivaji Park, Dadar(W), Mumbai 400028 Phone : 91-22-4440621, 4440615 Fax : 91-22-4449414

Trikon/NNA/Nov. 97










# वैशिष्ट्यपूर्ण व खास ध्येय असलेला एक उद्योग समूह



**शॉपिंग व कमर्शिअल कॉम्प्लेक्स 'रियाद', सौदी अरेबिया**

दूरदृष्टीच्या, द्रष्ट्या व्यक्तीने, म्हणजेच श्री. बी. जी. शिर्के यांनी शिर्के-सिपोरेक्स उद्योग समूहाची स्थापना केली. जेव्हा त्याची सुरूवात केली तेव्हाच, त्यांनी या उद्योग समूहाच्या संपूर्ण ध्येयाची आखणी केलेली होती. स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्णतः औद्योगिकरण करून तंत्रज्ञानाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट व किफायतशीर किंमत असलेल्या दर्जेदार उत्पादनांव्दारे देशाच्या इमारत बांधकाम साहित्याची (मटेरिअल्सची) गरज भागविणे हेच उद्दिष्ट होते.

**आमचे मनुष्यबळ हीच आमची शक्ती :**

आम्ही स्थापत्य शास्त्रज्ञ, अभियंते, रचनाकार, रासायनिक, तांत्रिक, व्यवस्थापन आणि वित्त या सारख्या विविध क्षेत्रातील व्यवसायिक व कामगार मिळून नऊ हजाराहून अधिक व्यक्तींची नेमणूक केलेली असून त्यांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली आहे. पुण्याजवळील मुंढवा येथील आमच्या ५३ एकराच्या प्लॉटमध्ये अत्याधुनिक संशोधन व विकासाच्या सोयी असलेले ९ अत्याधुनिक संपूर्ण सुसज्ज असे एकात्मिक कारखाने आहेत.

**आमची वैशिष्ट्ये :**

अत्याधुनिक पद्धतीने अति जलद गतीने, सर्वांना परवडण्याजोगी उच्च दर्जाची सर्व सोयी-सुविधा असलेली उपनगरे तयार करण्याचे आमचे ध्येय आहे. यासाठी आम्ही अशा मजबूत, त्वरीत उत्पादन करता येण्याजोग्या व परवडण्याजोग्या इमारत बांधकाम साहित्यांची अत्याधुनिक शास्त्र-तंत्राने निर्मिती करतो. बऱ्याच उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा गुणवत्ता दर्जाप्रत ठरविण्याचा शिक्कामोर्तब आहे. तसेच बी. जी. शिर्के कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी लि. आय. एस. ओ. ९००१ व सिपोरेक्स इंडिया लि. आय. एस. ओ. ९००२ प्रमाणित कंपन्या आहेत. शिवाय सिपोरेक्स उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा आय. एस. आय. शिक्कामोर्तब पण आहे. त्यामुळे आमची कामाची सर्वांगिण दर्जाप्रत, गती व किंमत सर्वांना परवडणारी असते. म्हणून देशात-परदेशात सर्वत्र आमच्या मालास मोठ्या प्रमाणावर मागणी आहे.

**आमचे सहभाग :**

आमचा स्वीडनच्या इंटरनॅशनेला सिपोरेक्स-अेबी, स्वीडन यांचेशी सहभाग आहे. तसेच आमच्या विविध उत्पादने व तंत्रज्ञानासाठी.



**सेंट्रल अ‍ॅथलेटिक स्टेडियम श्री शिवछत्रपती क्रीडा नगरी, बालेवाडी, पुणे**

अग्रगण्य कंपन्यांशी खालीलप्रमाणे तांत्रिक-सहकार्य आहे.
एल्वा, जर्मनी - ऑटोमेटिक वे-बॅचिंग व मिक्सिंग प्लॅन्टस, पोटेन एस.ए. फ्रान्स - टॉवर क्रेन्स (१ ते ५० टनांची क्षमता, उंची १०० मीटर्स पर्यंत), प्युराक स्वीडन - वेस्ट वॉटर ट्रीटमेन्ट प्लॅन्टस्, रीड सिस्टीमस्, यु. एस. ए. - प्रगत जीआयसी ग्रेन स्टोरेज सायलो सिस्टिमस्

**आमचे मानाचे तुरे :**

● स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्ण औद्योगिकरण ● प्रिफॅब साहित्य ● टर्नकी लंपसम-एक रकमी वट्ट ठेका पध्दती ● एकाच छताखाली आरंभापासून ते पूर्णत्वापर्यंतच्या सर्व महत्वाच्या सेवा ● आधुनिक धान्य साठवणूक व त्यांचे संरक्षण, हाताळणी इ. कोठारांची निर्मिती, उभारणी व स्थापना (इन्स्टॉलेशन) ● ३०० दिवसात क्रीडा नगरीचे बांधकाम-एक जागतीक विक्रम.

**भविष्य-काळातील आमच्या योजना :**

स्थापत्य व बांधकाम शास्त्राच्या औद्योगिकरणाचा सर्वत्र प्रसार-प्रचार. प्रत्येकास निवारा मिळवून देण्याचा प्रयत्न. भारतातील जंगले व नैसर्गिक साधन-संपत्तीचे रक्षण व पर्यावरणाचे संतुलन साधणे इ. इ. महत्वाच्या कामात कार्यरत असलेली शिर्के-सिपोरेक्स ही एक अग्रगण्य संस्था आहे. आमच्या तंत्रज्ञानाने व क्षमतेने गुणवत्तेत वस्तुनिष्ठ दर्जा राखणे हे आमचे ध्येय. उद्याच्या भारताचा एक अंगभूत व अविभाज्य घटक म्हणून नावारूपास येण्याच्या आशेने व आत्मविश्वासाने आम्ही मार्गप्रतिक्षा करीत आहोत.




**SHIRKE शिर्के सिपोरेक्स उद्योग समूह SIPOREX**

७२-७६, मुंढवा इंडस्ट्रिअल इस्टेट, पुणे : ४११ ०३६. फोन : ६७०१५१, ६७०७५५. फॅक्स : (०२१२) ६७१६१२, ६७०३१९
मुंबई : २६२४५७४/६७०३१९, २६२४८९४. बॅंगलोर : २२७७३६०, २२७७३६१. दिल्ली : ६४६४०७६, ६४६२३०८.
हैद्राबाद : ८४१७३८, ८४६५०८. नागपूर : ५३३५११.




हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे. पं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






